## ।। अथ श्रीमुद्गलपुराणे तृतीयः खंडः प्रारभ्यते ।।

ॐ श्रीगणेशाय नमः । शौनक म्हणती सूतास । द्विजा तूं मज तारिलेंस । सर्वार्थतत्त्वज्ञा सांगितलेंस । गणेशचरित परमाद्भुत पुण्य ।।१।। एकदन्ताचें माहात्म्य ऐकलें । परी द्विजोत्तमा कर्ण ना संतोषले । महोदराचें महिमान भलें । विस्तार करूनी मज सांग ।।२।। तो कोणत्या स्वरूपाचा असत । त्याचे अवतार किती जगांत । त्याचें क्षेत्र कोणतें असत । भूमीवरी कां अवतरला? ।।३।। हें सर्व मज सांगावें । सूत म्हणे शौनका ऐकावें । विप्रेन्द्रा धन्य तूं स्वभावें । ढुंढीचे रहस्य वाढविसी ।।४।। म्हणोनी मी हर्षित । सर्व सांगेन विस्तारें तुजप्रत । महोदराचें माहात्म्य अद्भुत । व्यासमुखांतून जें ऐकिलें ।।५।। दक्ष तुजसम विचारित । तेव्हां मुद्गल त्याला जें सांगत । तें सारें मीं तुजप्रत । सांगतो आतां ऐकावें ।।६।। दक्ष म्हणे मुद्गला तारिलें । मंगल कथामृत मज पाजिलें । आतां महोदरचरित्र जें घडलें । भवबंधमोचक तें सांगा ।।७।। मुद्गल म्हणती धन्य अससी । गणेशाची अमृतकथा विचारिसी । भावयुक्त मनें ती प्राशन करिसी । सांगतों तुज ऐक आतां ।।८।। महोदराचें माहात्म्य सविस्तर । वर्णन करण्या असमर्थ सुरवर । कोण तरी नर भूमिवर । सर्व विस्तारें वर्णू शके? ।।९।। सर्वसिद्धिप्रदायक । महोदर माहात्म्य हें निःशंक । ऐसाच प्रश्न एक । सूर्या विचारिला वालखिल्यांनी ।।१०।। दक्ष विचारी वालखिल्य कोण । काय विचारिती सूर्या प्रश्न । तें सर्व विस्तारें सांगून । कुतूहल करा दूर मुद्गला ।।११।। मुद्गल सांगती ऐक सांप्रत । वालखिल्य महर्षी असत । ते नित्य उपासना करित । रथस्थ भास्कराची भक्तीनें ।।१२।। ते महाभाग एकदां पहात । सूर्यास गणेशकीर्तनीं रत । तें पाहून झाले विस्मित । विचारिती ते सूर्यासी ।।१३।। भानुदेव तूं ब्रह्म असत । ऐसें वेदान्त प्रतिपादित । एक तूं

अद्वितीय ख्यात । अमृतात्मा निःसंशय ।।१४।। तुझ्या भजनें सिद्ध होत । परम योगी विष्णू मुख्य देव जगांत । तैसेचि विविध जन पावत । फळ आपुल्या कार्याचें ।।१५।। कर्माच्या मूळ रुपें सगुण । ज्ञानरुपें तूं सर्वत्र निर्गुण । दिवाकरा तुजहून अधिक गुण । वेदादींत अन्य न कोणी ।।१६।। तथापि तूं विशेषें भजत । गणनायका कां सतत । हा कोण गणेश नाम वर्तत । देव त्यास तूं कां भजसी ।।१७।। हें पाहून आम्हीं मोहयुक्त । जाहलों उत्सुक चित्तांत । म्हणोनी तेजाच्या नाथा त्वरित । तत्त्व सत्य सांगावें ।।१८।। गणेशाचें स्तवन करुन । कां भ्रमविता सर्व जन । ऐसें तयांचें वचन । ऐकून सूर्य म्हणे त्यांना ।।१९।। सर्व प्राण्यांचा आत्मा सांगत । त्यांना दक्षा रहस्य पुनीत । महाभागांनो ऐका सर्वसंमत । वालखिल्य मुनींद्रहो ।।२०।। गणनाथाचें ऐकून चरित । योगी व्हाल भविष्यांत । मीं आत्मा जगताचा वर्तत । वेद ऐसे वर्णिती ।।२१।। तें सर्व असत्य नसत । ज्ञान परी तुम्हां सांगत । तेणें भ्रमाचा नाश क्षणांत । होईल ऐसें जाणावें ।।२२।। असत्य ब्रह्म जें उक्त । तेथ मीं जीवधारक असत । एकं एव अद्वितीय जगांत । सत्यरूप महर्षींनो ।।२३।। वेदादि भाव भिन्नांत । आत्माकार मीं व्यवस्थित । सत्य असत्य हें द्वंद्व चित्तांत । जाणून घ्यावें विबुधोत्तमांनी ।।२४।। त्या सत्य असत्याचा अभेद । समरूप परात्मा आनंद । उभय त्या आनंदानें ब्रह्मवरद । विष्णू ऐसें होत ख्यात ।।२५।। सम आनंदाहून परम । अव्यक्त स्वरूप जें तुरीय ब्रह्म । सर्वांचा नेति स्वरूप कर्ता अभिराम । शंकर हें नांव तयासी ।।२६।। चौघांचा ह्या संयोग करित । तो स्वानंद प्रख्यात । सर्वसंयोग रूप वर्णित । वेदान्त तें ब्रह्म जाणा ।।२७।। स्वपदाहून न अन्य योग । संयोगात्मक तो सुयोग । तोच गणनाथ मायायुक्त पारग । संसाराच्या जाणावा ।।२८।। मायेनें सर्व भावांत । संयोग अभेदें स्वयं

निवसत । विप्रेशांनो ब्रह्म वर्णित । म्हणोनि मायेनें युक्त ।।२९।। अयोग परता संयोगाहून । निर्मायिक तें ब्रह्म महान । वेदान्त कथिलें असे पावन । महर्षींनो तत्त्व ऐका ।।३०।। तेथ कोणाशीही संयोग । कोणातही होत न तो अयोग । अभिन्न तो परमयोग । गणेश हा योगवाचक ।।३१।। संयोग अयोगांचा योग । तोच हा गणेशरूपी प्रयोग । शांतिप्रद ब्रह्म भावांत सुभग । ब्रह्मणस्पती म्हणती तया ।।३२।। सर्व ब्रह्मांचा जो पति । तो हा जाणावा ब्रह्मणस्पती । त्या गणेशाची सदा भक्ति । भजन पूजन करतो मीं ।।३३।। गण धातू समूहरूप असत । ऐसें व्याकरणज्ञ सांगत । बाह्यांतर योगें समूह ख्यात । म्हणून हा गणराज ।।३४।। ब्रह्मरूप गण मानित । त्यांचा स्वामी तो गणेश ख्यात । त्यासी भजत मी संशयातीत । विशेष भक्तीनें द्विज हो ।।३५।। आत्माकार जें ब्रह्म असत । तेंच तें एक गणात्मक जगांत । तो 'मी' हें जाणून भजत । स्वामीस त्या मीं भक्तिपूर्ण ।।३६।। मुद्गल म्हणती दक्षाप्रत । ऐकून सूर्याचें वचन सूक्त । वालखिल्य महर्षी विस्मित । हात जोडूनी तया म्हणती ।।३७।। रविदेवा गणेशाचें माहात्म्य योगद । सांगावें संपूर्ण तें विशद । जेणें तत्त्वार्थज्ञानकोविद । होऊ आम्हीं निःसंशय ।।३८।। रवी तेव्हा त्यास म्हणत । ऐका ही सकल सिद्धिदा कथा अद्भुत । सर्व पापें नष्ट करित । जैसी विधीनें मज सांगितली ।।३९।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे तृतीये खंडे महोदरचरिते रविवालखिल्यप्रश्नवर्णनं नाम प्रथमोऽध्यायः समाप्तः । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय पहिला संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नमः । वालखिल्य पुनरपि प्रार्थित । सूर्या विधीनें जें कथिलें चरित । गणेशाचें तें ऐकण्या उत्कंठित । जाहलों आम्हीं तें

सांगा ।।१।। सूर्य तेव्हां त्यास म्हणत । पूर्वी मी आत्मरुपीं संस्थित । सर्वलोकीं संचार करित । गणेशध्यानीं एकनिष्ठ ।।२।। योगीन्द्रांचा स्वतः गुरू असत । तेव्हां ब्रह्मदेव त्रैलोक्य रचित । सचराचर कश्यप होत । मुख्य प्रजापती सदृष ।।३।। आकृष्ण इत्यादी मंत्रानें करित । तपन माझें वर्षें अयुत । ध्याननिष्ठ तो वर देण्या जात । तदनंतर मी तया समीप ।।४।। त्याच्या आश्रमांत मी जात । मज पाहून तो वंदन करित । भक्तिभावें पूजित । स्तुति करी कर जोडुनी ।।५।। भक्तिनम्र मान वाकवून । वरदात्या माझें करी स्तवन । जगदाधारा तुला नमन । वंदन तुला आत्मरूपा ।।६।। परमात्म्यासी सूर्यासी । त्रिविधासी त्रिकाळज्ञासी । भेदाभेदविहीनासी । नानाभेद धारका नमन ।।७।। अनाकार देवासी शाश्वतासी । अमेयशक्तियुक्तासी । कर्माधारासी भानूसी । सर्वकर्ममया त्रिरूपा नमन ।।८।। अमृतासी ब्रह्मनिष्ठासी । अंतरात्म्यासी अर्धमयासी । रवीसी हरिदश्वासी । आदि मध्यांतहीना नमन ।।९।। त्यांच्या परी आधारासी । अनंतविभवासी तेजोराशे तुजसी । दीननाथासी सर्वासी । दीनांच्या पतीस माझें नमन ।।१०।। शत्रुहंत्यासी भक्तपालकासी । भुक्तिमुक्ति प्रदात्यासी । नानाखेळकरासी परेशासी । दिवस्पते पुरुषा नमन ।।११।। एकासी अद्वितीयासी । मायाधारासी मायिकासी । सूर्या संज्ञापते तुजसी । नमितो रक्षा मज शरणागता ।।१२।। तूं आत्माकारें सर्वत्र वसत । वेदही तव वर्णनीं मूक होत । तरी कैसी करूं मी स्तुति अज्ञात । केवळ नमितों भक्तिभावें ।।१३।। परमेशा तुझ्या चरणांबुजावर । माझें मन होवो स्थिर । ऐसी दृढ भक्ति दे हो पुत्र । दिवाकरा तूं माझा ।।१४।। द्विजांनों ऐसें ऐकून । सूर्य म्हणे मी प्रसन्न । मी तुझा पुत्र होईन । द्वादश आदित्य रूपयुक्ता ।।१५।। माझी उग्र भक्ति दृढ होईल । सर्वदा तुझ्या चित्तीं विमल । जें जें विप्रेंदा

इच्छिशील । तें तें सफल होईल ।।१६।। केवळ माझें करितां स्मरण । मी प्रकट होईन तत्क्षण । तुझ्या स्तोत्रें मी प्रसन्न । याच्या वाचनें भुक्तिमुक्ति ।।१७।। ऐसें सांगून कश्यपासी वचन । तत्क्षणीं झालों अन्तर्धान । तोही परम आनंदित होऊन । आपुल्या आश्रमीं वालखिल्यांनो ।।१८।। कश्यपाची पत्नी अदिती । माझें तप करी भावभक्ति । परम अद्भुत तपें माझ्याप्रती । याचना तीच तिनें केली ।।१९।। म्हणून मी पुत्रभावें जन्मत । कश्यपापासून तिच्या उदरांत । शुभकाळीं ती होत प्रसूत । मला जन्म तिनें दिला ।।२०।। जातकमादिक सारें करित । नंतर मौजीबंधन योग्य काळांत । वेदाध्ययन दीक्षा देत । मुनिसत्तम मजलागी ।।२१।। विश्वकर्मा तप आचरित । मुलीसाठी अत्यंत । पुढें संज्ञानामक होत । पुत्री त्याची कर्मरूपा ।।२२।। ती मज विवाहीं अर्पित । ब्रह्मा करी मज अभिषिक्त । ज्योतिग्रहांच्या राज्यांत । तेणें संतुष्ट मी झालों ।।२३।। सदाधार हें त्रैलोक्य असत । सचराचर त्यास करित । यथाकाल वृष्टीनें संतृप्त । कर्मांचा मी फलदाता ।।२४।। वेद म्हणती मी अंतरात्मा । सर्व जनांचा, जगदात्मा । ऐसा बहुत काळ जाता आत्मा । गर्वयुक्त मम जाहला ।।२५।। निराधार मी एकटा असत । माझ्या आधारें जग वर्तत । कश्यपाचा मी झालों सुत । गणेश आराधना न केली ।।२६।। असा कांहीं काळ लोटत । तैं दारुण विघ्न उत्पन्न होत । वालखिल्य मुनींनो ऐका अघटित । तेव्हां काय जाहलें तें ।।२७।। माली आणि सुमालिक आचरित । उत्तम तप दैत्य नितान्त । दिव्यवर्ष सहस्रपर्यंत । तेणें शिव संतोषला ।।२८।। त्यांसी तो वर देत । जो जो ते याचित । सूर्यतेजासम विमान मागत । दिव्य विमान त्यांसी लाभलें ।।२९।। त्या विमानांत बसून । त्यांनीं जिंकिलें त्रिभुवन । त्रिलोकाचें राज्य लाभून । चराचरावरी सत्ता त्यांची ।।३०।। ऐसा बहुत

काळ जात । दैत्य ते सदैव स्पर्धायुक्त । विमानांतून संचार करित । माझ्यासम तेज त्यांचें ।।३१।। विमानाचें तेज पसरत । संपूर्ण त्रैलोक्य मंडळांत । रात्रीचा लोप त्यानें होत । परम अद्भुत ती घटना ।।३२।। जेव्हां होत मी अस्तंगत । त्या वेळीं दैत्य बाहेर पडत । त्यामुळें दिवसचि भासत । उदयकाळींही ते येती ।।३३।। ऐसे ते देत्यपुंगव करित । माझें तेज निरर्थक जगांत । मीं झालो अत्यंत क्षुभित । परी माझें कांहीं न चाले ।।३४।। वरदानांचे बल अद्भुत । म्हणोनि दैत्य झाले उन्मत्त । ऐसें सात दिवस चालत । विस्मित झाले सर्व लोक ।।३५।। कर्माचा लोप सर्वत्र होत । संभ्रम सर्वांच्या मनांत । तेजदग्ध पृथ्वी होत । तैसेंचि तैं समस्त जन ।।३६।। तेव्हां मी अत्यंत क्रोधयुक्त । विमानावरी हल्ला करीत । माझ्या तेजें तें जाळित । दैत्य मूर्च्छित पडले भूवरी ।।३७।। ते दोघे शिवासी स्मरत । तेव्हां तो तेथ प्रकटत । क्रोधानें माझे शिर उडवीत । त्रिशूल मारुनी मजवरी ।।३८।। तत्क्षणीं मी काशींत पडलों । लुळा होऊन नंतर मेलों । जगीं कोणाही न दिसलों । नंतर संभ्रम जगीं सर्वत्र ।।३९।। सर्व जग तेव्हां संभ्रमांत । लोक म्हणती आश्चर्य घडत । सूर्य सांप्रत कां न उगवत? । ऐसे विचारिती परस्परांशीं ।।४०।। तें पाहून आश्चर्ययुत । महर्षि झाले समस्त । देवही सारे उद्विग्न होत । ब्रह्मा विष्णु प्रमुख तेव्हां ।।४१।। शंकरा समीप ते जात । नाना यत्नें सांत्वन करित । म्हणती शंकरा हें अघटित । काय केलेत दैत्यांसाठीं ।।४२।। सूर्याचें मस्तक तोडून । जगाचा आधार नष्ट करुन । तमोगुणें अविचार करुन । अकालीं संहार कां करिता? ।।४३।। त्याचें वचन ऐकत । शंकर म्हणती शोकयुक्त । दैवानें हें घडलें विपरीत । निमित्त मात्र मजसी जाणा ।।४४।। विघ्नराज हें दाखवित । दारुण विघ्न आपणांप्रत । पूर्वी मी आराधिला भक्तियुक्त । वरदान त्यानें मज दिलें

।।४५।। जेव्हां स्मरण कराल । तेव्हां तेव्हां पुढ्यांत पहाल । मजसी, तुमचें दुःख हरेल । माझ्या प्रभावें त्या वेळीं ।।४६।। म्हणोनि मी आतां स्मरण । करीतो गणेशाचें मनन । त्यांसी शरण जाऊन । सूर्यासी जिवंत करीन मीं ।।४७।। ऐसें बोलून हृदयांत । गणेशाचें ध्यान करित । मानस पूजा करुन याचित । रवीचें पुनर्जीवन ।।४८।। जगत् जीवनदाता मारिला । पाळिलें माझ्या वचनाला । दैत्यांसाठी परी झाला । आकांत आता त्रैलोक्यांत ।।४९।। सूर्यास मी मारिलें असत । तयासी द्यावें जीवन त्वरित । अन्यथा मी देहत्याग करित । गणेशा मज प्रसन्न व्हावें ।।५०।। ऐसी प्रार्थना ऐकत । तेव्हा गजानन प्रकटत । सूर्यास करी पुन्हा जिवंत । शंभू जाहला प्रसन्न ।।५१।। कश्यपसुत जीवित । नभोमंडळी झाला उदित । देव ऋषि झाले हर्षित । जयगान गाती गजाननाचें ।।५२।। ओमित श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे तृतीये खण्डे महोदरचरिते सूर्यसंजीवनदानं नाम द्वितीयोऽध्याय: समाप्त: । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय दुसरां संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नम: । सूर्य कथा पुढती सांगत । काशींत झालों पुन्हा जीवित । लोलार्क नामें झालों ख्यात । विस्मित झालों मानसीं ।।१।। मी सर्वांचा आत्मा असत । तरी मजसीं कैसे मरण येत? । मी मरता जगांत । जीवन कैसें संभवलें? ।।२।। आतां मज कोणी केलें जीवित । माझ्या मनीची सरली भ्रांत । मी जगाचा आत्मा असत । गर्व हा मज व्यर्थ होता ।।३।। म्हणोनि मी जाईन वनांत । सर्वसंग सोडून सांप्रत । ज्याच्या आधारें हें विश्व चालत । त्याचें भजन नित्य करीन ।।४।। ऐसा विचार करीत । जेव्हां निघालो वनाप्रत । तेव्हा मार्गी ब्रह्मा

भेटत । सांत्वन करी तो वेदवाक्यें ।।५।। सूर्या ऐक रहस्य अद्भुत । सर्वांचा तूं शांतिदाता असत । तपश्चर्येनें होशील शांत । वृथा परिश्रम कां करिसी? ।।६।। तूं सर्व भूतांचा आत्मा असत । तुझ्या आधारें जग वर्तत । आत्म्यासी मरण न संभवत । ब्रह्मवेत्ते ऐसें म्हणती ।।७।। नानाविध ब्रह्में उद्भवती । त्यांचा नायक तो ब्रह्मणस्पती । गणनायक जगाचा अधिपती । योगरूपें सर्वत्र असे ।।८।। कश्यपात्मजा तो असत । तरी विश्व कैसे नष्ट होत । कश्यपघरीं तू जन्मत । वरदान प्रभावानें ।।९।। अज्ञानानें विसरलास । गणाधिपा न पूजिलेंस । म्हणोनि विघ्नें कष्टलास । जगदात्म्या तुज मरण आलें ।।१०।। आतां त्याचें करी भजन । तेणें दूर होईल विघ्न । सूर्या संपूर्ण शुभ लाभून । गाणपत्य तूं होशील ।।११।। योगशांती तुज लाभेल । ऐसें ब्रह्म्याचें वचन अमल । गणराजाचें विचेष्टित विमल । सांगा मज पितामहा ।।१२।। स्वामी बोध करावा मजप्रत । संशय दूर करावा त्वरित । जरी गणेश शांतियोगयुक्त । विघ्नें तरी तो कां आणतो? ।।१३।। तें ऐकून ब्रह्मा म्हणत । विकारी प्राण्यासम विघ्नें निर्मित । तैसाचि गणेश दूर करित । विघ्नें हेंही कैसें घडे? ।।१४।। महाप्राज्ञा सूर्या तुज सांगेन । सांप्रत तुज मी तें ज्ञान । जें ऐकता संशय हरुन । गणेशभक्त तूं होशील ।।१५।। गणेश पूर्ण योगशांतिमय देव । नानाविध रची विश्व । हे निश्चित परी भ्रांतिस्वभाव । मोह भुलवी जग ब्रह्मासी ।।१६।। त्यांचा मोह नष्ट करण्यास । योगशांति त्यांना देण्यास । योगमार्ग निर्मी सुरस । योगसेवेनें शांतिप्रद जो ।।१७।। तेथ त्याचें कलांश गर्वित । ब्रह्माकार शिवादी स्वनामांत । त्यांचा गर्व हरण्या निर्मित । विघ्नें तेव्हां गजानन ।।१८।। त्यांस शांतिप्रदानार्थ विघ्नदाता । विघ्ने तयांसी दावितां । गर्वहीन होत होउन तत्त्वता । योगशांती इच्छिती ते ।।१९।। योगशांति असे शाश्वत । मूलभूत सर्व

जग ब्रह्मांप्रत । सूर्या महायोग साधित । तेव्हां शांतिरूप ते होती ।।२०।। तदनंतर विघ्न हरण करित । ढुंढी देव तयांचें सतत । विघ्नेश्वरा भजती अविरत । भक्तिभावें तदनंतर ।।२१।। योगशांतिमय पूर्ण निर्मित । म्हणोनी विघ्नें जगांत । देवर्षी साधू दुष्टांप्रत । विघ्नार्थ विघ्ने न निर्मी ।।२२।। ब्रह्म्याचें ऐकून वचन । सविता म्हणे प्रसन्न मन । जेणें करावें योगसाधन । ऐसा विधि मज सांगा ।।२३।। सर्वज्ञा मज गणेशाची प्राप्ती । जेणें होईल ऐसी योगरीती । गणेश मी होऊन निश्चिती । सांगावी भक्तातें ।।२४।। ब्रह्मा म्हणे उत्तम प्रश्न । विचारिलास तूं कश्यपनंदन । जाणसी तरी सर्व विसरून । एकमनें ऐक आतां ।।२५।। मायाशक्ति असद्रूपा असत । भेदाकारा ती वर्तत । महामते सर्वात्मा सतत । सद्रूप तूं जाणावा ।।२६।। त्यांचा निर्माता सदानंद । विष्णु साम्ययुक्त विशद । ज्यांत नसे सत् असत् आनंद । तो शिव त्रिहीन असे ।।२७।। त्या चारांच्या संयोगें होत । स्वानंद जगीं परिकीर्तित । स्वानंदाहून परब्रह्म नसत । अन्य संयोगात्मक जें ।।२८।। तोच गणराज मायाखेलक । संयोग अभेदभावें पालक । जग ब्रह्मांत शांतिदायक । सदैव तो स्थित असे ।।२९।। अयोगांत मायाहीन । गणेश ब्रह्मवाचक असून । सर्व संयोगहीन पावन । समाधि सुखदाता प्रभू ।।३०।। संयोग अयोगांचा योग । गणेश हा शांतियोग । योग शांतिप्रद प्रयोग । शांतीची शांती तो ख्यात ।।३१।। मनोवाणीमय सर्व असत । गकार अक्षरें उक्त । मनोवाणीविहीन वर्तत । तें तें जाण णकारज ।।३२।। त्या गणांचा स्वामी असत । गणेश ब्रह्मांचें ब्रह्म प्रख्यात । सामवेद ऐसें सांगत । त्यास भजावें सूर्या तूं ।।३३।। त्याची द्विविधा माया असत । सिद्धिबुद्धिपरा जगांत । त्यांच्या साधनें हा खेळत । नानार्थास्तव गणनायक ।।३४।। चित्त पंचविध असत । बुद्धिरूप सूर्या हें विस्मित ।

सिद्धि ऐश्वर्य भोगयुक्त । पांच भेद तियेचेही ।।३५।। त्यांचे बिंबिस्वरुप असत । तें नष्ट करी योगसेवेंत । तेणें श‍ंतियोग प्राप्त । तुज होईल नि:संशय ।।३६।। ऐसें सांगून ब्रह्मा देत । गणेश षडक्षर मंत्र तयाप्रत । सूर्य विधियुक्त पूर्ण तो आचरित । जाऊनी एका वनांत ।।३७।। विधीस प्रणाम करुन । उग्र तपश्चर्या करुन । निराहार परायण होऊन । जपत होता मंत्र हृदयीं ।।३८।। गणेशासी चित्तीं ध्यात । ऐशी वर्षसहस्रें जात । तेव्हां गजानन प्रसन्न होत । भक्तिभावें प्रकट होई ।।३९।। आपुल्या गणांसहित । प्रकटून बोध दे सूर्याप्रत । विघ्नप साक्षात् आदरयुत । भानूसी शांतियोग शिकवी ।।४०।। गणेश म्हणे सूर्या सांप्रत । वर माग जे इच्छित । ते सर्व मी देईन तुजप्रत । महाभागा मी प्रसन्न ।।४१।। गणेशवाणी ऐकत । तेव्हां सविता जागृत होत । तपश्चर्या सोडून पहात । प्रत्यक्ष पुढ्यांत गजानन ।।४२।। भक्तीनें तो प्रणाम करित । परी वाटे त्यास भ्रान्त । म्हणे सत्य हें कां स्वप्न असत । स्तुति करी कर जोडून ।।४३।। सूर्य म्हणे विघ्ननाथा नमन । दुरात्म्यांसी विघ्नकर्त्या वंदन । भक्तविघ्नहर्त्या अभिवादन । तुज करी मीं पुन:पुन्हा ।।४४।। चतुर्बाहुधरासी मूषकवाहनासी । नागयज्ञोपवीतासी । नाभिशेषासी महोदरासी । सिद्धिबुद्धियुता नमन ।।४५।। शूर्पकर्णासी सर्वासी । एकदन्तासी गजवक्त्रधरासी । भालचंद्रासी चिंतामणिधरासी । रक्तांबरासी नमन असो ।।४६।। रक्तवर्णासी अमेयासी । नानाभूषणयुक्तासी । नानालीलाकरासी । अनाधारा नमन तुला ।।४७।। सर्वांच्या आधारासी । स्वानंदवासी नमन तुजसी । इक्षुसागर खेलकासी । हेरंबा तुज मी वंदित ।।४८।। लंबोदरासी ब्रह्माधीशासी । जगत् ब्रह्मपात्रासी । निराकारासी सर्व पालकासी ।

साकारा ढुंढे तुज नमन ।।४९।। साकारनिराकार योगासी । योगशांतिप्रदा तुजसी । योगशांतिमया योगेशा तुजसी । योग्यांस योगदात्या नमन ।।५०।। ऐसें सूर्य भक्तिरसयुक्त । जेव्हां गणेशाचें स्तवन करित । बाष्पकंठ अकस्मात । रोमांचयुक्त तो होई ।।५१।। सूर्याचा देह पुलकांकित । भक्तिमग्न तो शांत वसत । त्यास गणनाथ तेव्हां म्हणत । भक्तिरस परिप्लुत ।।५२।। तूं रचिलेलें हें स्तोत्र जगांत । भुक्तिमुक्तिप्रद निश्चित । माझी प्रीती वाढवील सतत । इच्छितप्रद सर्वांसी ।।५३।। वाचक श्रोते लाभतील । मनोवांछित जें जें असेल । त्यांचा आनंद वाढेल । माझ्या वरदानप्रभावानें ।।५४।। तुझ्या स्तोत्रें मी तोषित । तपानें मी प्रसन्न असत । माग वर जें हृदयी वांछित । देईन सर्व तें निश्चित ।।५५।। ऐसें ऐकून गणेशवचन । भानू भक्तिपरायण । गणाधीशा हर्षनिर्भर मन । म्हणे दृढ करा भक्ति माझी ।।५६।। जेव्हां जेव्हां स्मरण करीन । तेव्हां दर्शन देऊन । जें जें जेव्हां इच्छिन । तें तें सफल जगीं होवो ।।५७।। तथास्तु म्हणून गजानन । त्वरित पावले अन्तर्धान । मीं तेथ राहिलों खिन्न । वालखिल्य ऋषींनो ।।५८।। नंतर गणेशमूर्ती एक स्थापित । आदरें मीं ब्राह्मणांसहित । भक्तिभावें पूजन करित । त्या स्थानीं मीं सर्वांसह ।।५९।। नंतर स्वगृहीं परतून । मूर्ती गजाननाची बनवून । आता पूजी गजानन । सदैव मी परमानंदें ।।६०।। हें सर्व माझें चरित । अनुभवयुक्त कथिलें सांप्रत । वालखिल्यांनो सांगा मजप्रत । आणखी काय इच्छा असे? ।।६१।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे तृतीये खंडे महोदरचरिते सूर्यवरप्रदानं नाम तृतीयोऽध्याय: समाप्त: श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय तिसरा संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नमः । सूर्याचें ऐकून चरित । वालखिल्य गणेश भक्तियुक्त । पुन्हा विनविती सूर्याप्रत । मुद्गल कथा ती सांगती ।।१।। सूर्यदेवा तुझे चरित्र ऐकिलें । त्या कथामृतानें तोषलें । चित्त आमुचें सांप्रत पहिलें । गणेशचरित आम्हां सांगा ।।२।। जें मोह पाशांचें निकृन्तन । जेणें जन होत भ्रांतिहिन । मोह जो भुलवी सर्वांचे मन । त्याचें चरित्र सांगावें ।।३।। त्या मोहानें संछादित । जन होती जेव्हां संभ्रान्त । गजानन न ओळखित । गणेशासी ते त्या वेळीं ।।४।। ऐसें तें ऋषि विचारित । तेव्हां महातेज भानु म्हणत । गाणपत्य तो तेजयुक्त । आनंदून स्वचित्तांत ।।५।। सांप्रत तुम्हासी सांगेन । इतिहास जो पुरातन । मोहासुर चरित्र पावन । गणेशज्ञान संयुत ।।६।। एकदा तारक नामा दैत्य होत । ब्रह्मदेवाच्या वरदानें सत्तायुक्त । त्रैलोक्याचें आधिपत्य लाभत । पीडा देत देवगणांसी ।।७।। समस्त मुनिजनही संत्रस्त । राहूं लागले वनांतरांत । नंतर बहुत काळ जात । तैं शरण जाती पार्वतीसी ।।८।। देवगण ऋषिगणांसहित । शिवध्यान करिती सतत । तेव्हां वरदान ते करिती प्राप्त । शिवपुत्र मारील तारका ।।९।। शिववीर्यसंभूत सेनाधीश । पुत्र वधील दैत्येश । यांत न धरा संदेहास । आश्वासन हें देवां मिळे ।।१०।। परी महादेव वनांत । मग्न होता तपांत । पार्वतीसी देवगण प्रार्थित । शंकराचें मन वळविण्या ।।११।। तेव्हां भिल्लिणीचा वेष घेऊन । शंभूस मोहविण्या उत्सुक मन । शंकराश्रमीं जात प्रसन्न । इतस्ततः हिंडत होती ।।१२।। अतीव मोहक रूप घेऊन । फुलें तोडण्या जात आश्रमांतून । त्या वेळीं ध्यान संपून । शिवें एकदां तिज पाहिलें ।।१३।। रूपयौवनशालिनी पाहिली । शिवासी मोहिनी पडली । आदि मायेनें तैं केलीं । चित्तवृत्ति त्याची कामविव्हल ।।१४।। हावभाव भिल्लिणीचे पाहत । शिव झाला परममोहित । तिज पकडण्या जात ।

भिल्लिण दूर पळू लागे ।।१५।। तिचा पाठलाग करित । शंकर झाला कामसंत्रस्त । जेथ ती जात तेथ संचरत । नग्न शंभू कामासक्त ।।१६।। ऐशा प्रकारें तो धावत । तिज पकडण्या वनांत । परी ती न होय हस्तगत । शिववीर्य गळून पडलें ।।१७।। तत्क्षणीं ती भिल्लीण होत । अन्तर्धान तें शिव पाहत । तैं शिवही शांति लाभत । विकारशमन जाहलें ।।१८।। अद्भुत त्या शिववीर्यांतून परम । एक पुरुष घेत जन्म । मोहरूप जो उग्र परम । चार बाहू तयासी ।।१९।। तो संस्थित वनांत । एकाकी श्रेष्ठ तेजरूपांत । चारू रूप सर्व अवयव संयुत । महामानी तो शिवपुत्र ।।२०।। तो कंदमूळ फळें खात । इतस्तत: वनांत हिंडत । शिव तेव्हां होत दु:खित । ध्यानबळें सर्व जाणून ।।२१।। पार्वतीचें तें कृत्य जाणून । मनीं क्रोध त्याच्या दाटून । तो कामास जाळीं तत्क्षण । स्वस्थानीं मग परतला ।।२२।। पार्वती त्यास प्रार्थित । देवांचे साहाय्य करा म्हणत । शंभू कामदेवा स्मरत । पुढ्यांत पाही तैं अनंगासी ।।२३।। महेशास तो प्रणाम करित । महायशा रूद्रासी स्तवित । म्हणे पुन्हा करावें देहयुक्त । मजला आपण महेश्वरा ।।२४।। कामाची प्रार्थना ऐकत । त्यांस गणेशमंत्र विधिसंयुत । एकाक्षर परम देत । सदाशिव त्यांसी उपदेशी ।।२५।। म्हणे या मंत्रानें आराधना । करून तोषवी गजानना । तो पुरवील तुझी मनकामना । यांत संशय अल्प नसे ।।२६।। नाशिक क्षेत्रीं कामदेव जात । स्त्रीसहित तप करित । ध्यान तैसा जप करित । गणपतीचा भक्तिभावें ।।२७।। ऐसीं वर्षें सहस्र जात । तेव्हां गणनायक प्रकटत । माग वरदान म्हणे जें ईप्सित । पुरवीन मीं तें सत्वर ।।२८।। गणेशासी पाहून उठत । स्तुति करी होऊन प्रणत । भक्तिभावें मान वाकवीत । कामदेव त्यासमयीं ।।२९।। गणेशासी पाशांकुशधारकासी । दंताभयधरासी मूषकध्वजासि । गजवक्त्रासी देवासी । शूर्पकर्णा तुज नमन

माझें ।।३०।। महोदरासी पूर्णासी । पूर्णानंदासी सर्वाकारासी । सर्वासी गुणेशासी । स्थूल सूक्ष्मादि भेदासी नमन ।।३१।। गुण चालकासी देह देहीमयासी । प्रकृतीच्या लयरुपासी । विदेहासी स्वसंवेद्यपतीसी । गणेशा तुज नमोनमः ।।३२।। रजोगुणें सृष्टि निर्मिसी । सत्त्वगुणें तूं पाळिसी । तमोगुणें संहार करिसी । कर्माकारा तुज नमन ।।३३।। जगद्रुपासी स्थावरासी । चरासी अनाकारासी । हेरंबासी ब्रह्मपतीसी । योगदायका तुज नमन ।।३४।। वेदादि अगम्यरूपासी । योग्यांसी योगप्रदासी । काय स्तवूं मी तुजसी । गणाधीशा अल्पज्ञ मी ।।३५।। आता मज वर दे गजानना । दृढ भक्ति व्हावी तुझी प्रसन्ना । माझें अंग पुनरपि सूक्ष्मनयना । मजला जगीं प्राप्त व्हावें ।।३६।। गणेश त्यासी वरदान देत । माझी भक्ति रतिपते चित्तांत । तुझ्या दृढ होऊन त्वरित । शिवदग्ध देह जरी तुझा ।।३७।। पूर्ववत् देह संजीवन । करण्या मी असमर्थ मान । पूर्वीं शंकरा वरदान । दिलें म्हणोनी याविषयीं ।।३८।। माझ्या वरानें सामर्थ्ययुत । शिव झाला सर्वार्थयुक्त । म्हणोनि तुजसी मी देत । अद्भुत भिन्न नवीन देह ।।३९।। यौवन स्त्रीजन पुष्पें सुवास । गायन मधुरसीं निवास । मृदुल अंडज शब्द सुरस । वसंत सुवासादी ।।४०।। चंदन विषयासक्तांचा संग । नरांच्या गुह्य दर्शनें विकार तरंग । मृदु पवन नव वस्त्रें चांग । भूषणादिक हे नूतन देह ।।४१।। ऐशा हितावह देहें युक्त । तू शंकरादींसी जगांत । जिंकशील होऊन ख्यात । मनोभूः स्मृतिभू ऐशा नावें ।।४२।। तूं रचिलें हें स्तोत्र । सर्वप्रद होईल पवित्र । दग्धमूळ काष्ठां अंकुर पत्र । फुटतील याच्या प्रभावानें ।।४३।। ऐसें गणेशवाक्य ऐकून । काम म्हणे देवा तूं प्रसन्न । माझें हित केलेंस पावन । नूतन देह देऊनिया ।।४४।। परी पूर्ववत् देह द्यावा । ढुंढे मनोरथ माझा पुरवावा । शंकरे दग्ध करिता देवा ।

अनंगा मज तूं रक्षावें ।।४५।। मुद्गल म्हणती दक्षाप्रत । कामाचें वचन ऐकून संतोषित । भक्तिभावें तपें प्रसन्न होत । कामदेवासी म्हणतसे ।।४६।। तूं मागितलें जें अघटित । परी तूं अससी भक्तियुक्त । मनोभवा तुझें हित । प्रिय वांछित पूर्ण करीन ।।४७।। यादवांत स्वयं विष्णु घेईल । कृष्ण अवतार विमल । लक्ष्मी रुक्मिणी होईल । त्यांचा पुत्र तूं होशील ।।४८।। प्रद्युम्ननामें विख्यात । सर्वमान्य सुंदर देहयुक्त । ही रती तुझी वल्लभा होत । भार्या त्यावेळीं तुझी ।।४९।। ऐसा वर देऊन अन्तर्धान । पावला देव गजानन । स्वानंदलोकीं जात पावन । काम परतला मयूरक्षेत्रीं ।।५०।। तेथ आपुल्या पत्नीसहित । यात्राविधानें विघ्नपा पूजित । गणनाथा प्रीत्यर्थ तप आचरित । एक वर्षभर भक्तीनें ।।५१।। विघ्ननायक संतुष्ट होत । तेव्हां त्यास दर्शन देत । कामदेव त्यासी प्रार्थित । देहादींचें जाणी सत्यरुप ।।५२।। म्हणे भूस्वानंद हे क्षेत्र असत । येथ मी निवास इच्छित । स्थान देई मजप्रत । सेवा करण्या गणाधीशा ।।५३।। येथ मृत्यू पावता लाभत । ब्रह्मपद प्राणी पुनीत । म्हणोनी मज रक्षावें सतत । गणनाथ आदिदेवा ।।५४।। गणनाथ तथाऽस्तु म्हणत । पश्चिमद्वारीं जी शक्ति स्थित । विघ्नप तिजला आज्ञापित । कामदेवासी स्थान द्यावें ।।५५।। तुझ्या वामभागांत रतीस । दक्षिणांगी कामदेवास । देई जागा करण्या निवास । या क्षेत्रांत सर्वदा ।।५६।। शक्ति ती आज्ञा पाळित । रतीसह कामदेवा आश्रय देत । ऐशा रीतीं मयूरक्षेत्रांत । निवास घडे रतिकामांचा ।।५७।। तेव्हांपासून सर्वमान्य होत । महर्षींनों कामदेव जगांत । त्रैलोक्य विजयी मोहप्रद सर्वांप्रत । निर्भय सुंदर स्वरूप ।।५८।। हें कामदेवाचें चरित । जो वाचित अथवा ऐकत । त्यास काममोह न होत । कदापिही जगतांत ।।५९।।

ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे तृतीये खंडे महोदरचरिते कामचरितं नाम चतुर्थोऽध्याय: समाप्त: । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय चौथा संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नम: । तदनंतर कामसमायुक्त । शंकर पार्वतीसह रमत । पुत्रकामार्थ हर्षसमन्वित । साठ हजार वर्षे गेलीं ।।१।। परी देवर्षि सत्तमहो क्रीडारत । महेशाचें रतिसुख अद्भुत । महामायायुत न जाणत । शंभू दिवसरात्र कांहीं ।।२।। तेव्हां महेशाच्या रतिभंगार्थ येत । देव तेथ समस्त । अग्नीस द्विजरुपें ते पाठवित । भिक्षा मागण्या त्या स्थळीं ।।३।। जेथ शंकर पार्वती रतिमग्न असत । तेथ जाऊन भिक्षा तो मागत । ती याचना ऐकता वीर्य पडत । शिवाचें सत्वर भूतली ।।४।। शिव वरती उठता देत । पार्वती भिक्षारूपें तें वीर्य भिक्षुकाप्रत । शिववीर्य तें अग्नि प्राशित । दाह जाहला तयाचा ।।५।। तेव्हां तो तें गंगेत । सत्वर सोडुनिया देत । तेथ सहा कृत्तिका येत । स्नान करण्या त्या वेळीं ।।६।। त्या आचमन समस्त करिती । तेथील गंगाजळ प्राशिती । स्नान करुन स्वगृहीं जाती । तेज उजळें मुखांवर ।।७।। परवीर्ययुक्त त्यांस पाहत । पति त्यांचा त्याग करित । तेव्हां बांबूच्या बेटांत । महावीर्य त्या टाकिती ।।८।। पुनरपि स्नान करुन । गृहा जाती त्या परतून । त्या शरस्तंबीं बाळ प्रसन्न । सहा मुखांचा जन्मला ।।९।। नारद त्या जागीं पाहत । शिशु तैं ध्यानानें जाणत । कैलासीं जाऊन सांगत । मुनिसत्तम तो शक्तीसी ।।१०।। यदृच्छेनें मी संचार करित । पार्वती मीं पाहिला सुत । तो तुझा असे निश्चित । देवी त्यांस तूं पाळावें ।।११।। तेव्हां आणून त्या बाळा पाजित । स्तनपान पार्वती स्नेहयुक्त ।

नंतर अग्नि गंगा कृत्तिकादी जात । त्या बाळास पहावया ।।१२।। शिव सत्कार सर्व मातांचा करी । त्या परतती स्वगृहीं नंतरी । ब्रह्मा ईशादी देव मुनिगण करी । अभिषेक त्या बाळातें ।।१३।। देवसेनापतिपदी नेमित । तो बाळ सेनेसह जात । तारकाचा नाश करण्या त्वरित । देवप्रार्थना ऐकूनी ।।१४।। स्कंद तारकांचे युद्ध चालत । परम दारुण अद्भुत । स्कंद तेव्हां शक्तीनें ताडित । महादैत्य तारक मूर्च्छित झाला ।।१५।। परी क्षणभरें संज्ञा लाभत । गदेनें स्कंदा मारित । तो अत्यंत क्रोधयुक्त । कार्तिकेय रणीं पडला ।।१६।। तें पाहून पलायन । देव करिती भयभीत मन । कार्तिकेय बेशुद्ध पाहून । दैत्य गेला स्वस्थाना ।।१७।। तदनंतर औषधीप्रभावें सावधान । करिती स्कंदास देव उन्मन । स्कंद परम दुःखार्त होऊन । शंकरासी शरण गेला ।।१८।। जयाचा उपाय सांगावा । शिव शांतिप्रद तो असावा । सर्वसाधक तो बरवा । पूर्णभावें तो मी करीन ।।१९।। तेव्हां गणेशाचा षडक्षर मंत्र देत । शंभु विशाखास त्या देत । विधीचें ज्ञान सांगत । सविस्तर तयाप्रती ।।२०।। शंभू तयासी सांगत । ऐक स्कंदा महायोग जेणें शांत । होशील तूं जरी चित्तांत । चिंतामणीस जाणिसी माझ्यासम ।।२१।। जें जें चित्त वांछित । तें तें पुत्रा लाभत । योगसेवेनें चित्त होत । ब्रह्माकार जाण पुत्रा ।।२२।। अंतर्बाह्य जे भेद वर्तत । ते सर्व चित्तसंभव असत । ओंकार अर्थसमायुक्त । चित्तरुप निःसंशय ।।२३।। ब्रह्म स्वकोत्थान परोत्थान । चित्तरूप मोहप्रद करून । बुद्धीनें त्यात निर्मून । स्वानंद निवृत्ति दोन्हीही ।।२४।। अधिक काय सांगावें । चित्त झालें सर्वात्मक आघवें । ब्रह्माकार त्या जाणावें । जगतास आधारभूत ।।२५।। ऐसें हें पंचविध चित्त । योगसेवेनें तें सोड त्वरित । ब्रह्म जें बिंबित चित्तांत । तें असते भ्रमयुक्त ।।२६।। बिंबभाव सोडून । चित्ताचा त्याग करुन ।

महाभागा तूं अभिन्न । चिन्तामणि होशील पुत्रा ।।२७।। हेंच रे परम ज्ञान। शांतिरूप जें महान । रवि कथा सांगे ती पावन । पुढें काय झालें असे ।।२८।। कार्तिकेय शिवा प्रणाम करित । गेला निघून वनांत । विघ्नेशाचें ध्यान करित । विधिपूर्वक षडक्षर मंत्रें ।।२९।। स्कंद उत्तम तप आचरित। वायु भक्षण करून राहत । जपध्यान परायण सतत । दंडकारण्य देशांत ।।३०।। वर्ष सहस्त्र ऐसें तप करित । गजानन तेव्हां तोषत । शांतियोग प्राप्त होत । कार्तिकेया तत्कृपेनें ।।३१।। तरिही करित होता भजन । गणेश देती त्याला दर्शन । त्यांना प्रकट पाहून । प्रणाम करूनी पूजन करी ।।३२।। कार्तिकेय करसंपुट जोडित । स्वानुभव परायण स्तवित । योगरूपा तुज नमित । संप्रज्ञात शरीरा तुज ।।३३।। वंदन असंप्रज्ञात-मूर्ध्नीसी । तैसें त्या योगमयासी । वामांगी भ्रान्तिरूपा सिद्धीसी । सर्वदा प्रभू तूं वागविसी ।।३४।। भ्रांतिधारकरूपा बुद्धि असत । दक्षिणांगीं तुझ्या दिसत । माया सिद्धिरूपा वर्तत । देव मायिक बुद्धिसंज्ञ ।।३५।। त्यांच्या योगें गणेशान स्थित । गकार जगद्रूप वर्तत । णकार ब्रह्मवाचक उक्त । त्यांचा योग गणेशांत ।।३६।। चतुर्विध हें सर्व जगत । ब्रह्मतंत्र सदात्मक अद्भुत । म्हणोनि गणेशा तुझे चार हस्त । पुन:पुन्हां तुज नमन ।।३७।। स्वसंवेद्य जें ब्रह्म । तेथ खेळसी तूं अनुपम । स्वानंदवासी मनोरम । स्वानंदपती तूं तुज नमन ।।३८।। द्वंद्वरूपें भक्तहृदयीं वसत । चोरासम तुझें मूषकवाहन होत । जगीं ब्रह्मांत राहून भोगित । भोग तूं सारे सुयोगानें ।।३९।। परी जगांस तैसें ब्रह्मांस अज्ञात । गणेशा तुझें महत्त्व अद्भुत । कार्य त्याचें गुप्त असत । चोरासम भोगकर्ता तूं ।।४०।। म्हणोनि तुझें मूषकवाहन । प्रतीक हें सजलें छान । मूषकावरी आरूढ होऊन । हेरंबा तूं विश्वचालक ।।४१।। तुज योगशांतिधराचे स्तवन । काय करुं मी पामर जन । वेदादींनीही धरलें

मौन । देवा तुला नमन करितों ।।४२।। ऐसें स्तोत्र ऐकत । तेव्हां गणेश त्यास म्हणत । वर माग महाभाग इच्छित । दुर्लभही सुलभ करीन ।।४३।। तूं रचिलेलें हें स्तोत्र वाचित । अथवा जो हें ऐकत । कार्तिकेया सर्व सिद्धिप्रद होत । सर्व इच्छा मीं पुरवीन त्याच्या ।।४४।। ऐसें गणेशवाक्य ऐकून । कार्तिकेय हर्षभरित । योगज्ञ तो गणेशा म्हणत । स्कंद परम भक्तिभावें ।।४५।। काय मागूं मी गजानना । सर्व भ्रान्तीची भावना । म्हणोनी दृढ भक्ति माझ्या मना । सदैव देई विघ्नराजा ।।४६।। माझी उग्र भक्ति तव हृदयांत । निवसेल ऐसें वरदान मीं देत । गणराज भक्तवत्सल त्वरित । तारकादी दैत्या मारशील तूं ।।४७।। अन्य जें जें असेल वांछित । तें तें सफल होईल निश्चित । ऐसें बोलून अंतर्हित । जाहला गणेश भक्तोत्तमा तो ।।४८।। कार्तिकेय तेथ स्थित । गणपाचें स्मरण करित । ब्राह्मणकरांनी मूर्ति स्थापित । त्या स्थानीं गणपतीची ।।४९।। लक्षविनायक नाम देत । त्या गणेशरूपा द्विजप्रेरित । गणेशाच्या दर्शनमात्रें होत । तेथ वांछिताचा लाभ ।।५०।। तेथ मरण येता प्राप्त । होत ब्रह्मपद नराप्रत । तदनंतर स्वगृहीं परतत। कार्तिकेय तो प्रतापी ।।५१।। देवांसहित युद्ध करित । तारकासुरासी मारित । देवांसी करुनी संकटमुक्त । गणेशक्षेत्रीं तो गेला ।।५२।। तेथ विघ्नेशा आदरें भजत । ऐसें हें स्कंद माहात्म्य कथित । हें वाचिता वा ऐकतां पुनीत । ब्रह्मभूयकर सर्वप्रद ।।५३।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे तृतीये खंडे महोदरचरिते स्कंदमाहात्म्यं नाम पंचमोऽध्यायः समाप्तः । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय पांचवा संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नमः । वालखिल्य ऋषि सूर्यास म्हणत । महाभागा

ऐकिलें ब्रह्मचरित । परी आम्हीं न झालों तृप्त । अमृतपानासम कथा श्रवण ।।१।। आता मोहासुराचें माहात्म्य सांगावें । जगदीश्वरा तें बरवें । शिववीर्यापासून स्वभावें । जन्मून त्यानें काय केलें? ।।२।। मुनींचे वचन ऐकत । महामति सूर्य त्यांसी सांगत । मोहासुराचें अद्भुत चरित । मुद्गल सांगती दक्षासी ।।३।। शिववीर्यापासून जन्मत । मोह तो परम शोभन शरण जात । शुक्राचार्यासी जो वेदवादरत । त्यास वंदून म्हणे त्याला ।।४।। आपुला जन्मवृत्तान्त । सर्व त्यास निवेदित । शिष्य म्हणोनी स्वीकारा सांप्रत । विनाथ मी तवाधीन ।।५।। ऐसें त्याचें ऐकून वचन । शुक्र दयायुक्त होऊन । मौंजीबंधनादिक करून । जृंभासुरा देत पुत्रत्वें ।।६।। त्या मोहासुरानें अध्ययन । केलें वेदादि शास्त्रांचे पावन । प्रमादासुरनामें असुर महान । आपुली कन्या त्यास देई ।।७।। मदिरा नामक ती सुता । रुपलावण्य संयुक्ता । मोहासुराची होय कान्ता । प्रमाद असुर संतोषला ।।८।। आपुल्या तातास नमन करून । मंत्र घेत शुक्रापासुन । सुर्याच्या सदनीं जाऊन । करुं लागला परम तप ।।९।। ऊर्ध्वदृष्टि तो लावित । सूर्यमंडळी एकटक पाहत । मंत्र जपे भक्तियुक्त । निराहार राहून पारायणें करी ।।१०।। दिव्य वर्ष सहस्त्रें उलटत । तेव्हां दिवाकर प्रसन्न होत । त्यास वर देण्या प्रकटत । स्वभक्तानुकंपी त्या वेळीं ।।११।। केवळ अस्थिपंजरयुक्त । मोहासुरासी पाहत । त्याचे परम धैर्य पाहून विस्मित । जाहला तेव्हा अर्यमा ।।१२।। रवि देववर त्यास जागा करित । तपश्चर्या ध्यान स्थित । तो ध्यानांतून बाहेर येत । तेव्हां त्यास म्हणे वर माग ।।१३।। प्रत्यक्ष रवीसी पुढती । पाहुनी विस्मित तो चित्तीं । करोनिया भावभक्ती । पूजी मग नानाविधि ।।१४।। कृतांजलि तो स्तवन करित । मोहासुर म्हणें मजप्रत । नमन सूर्या सर्वरूपा तुजप्रत । भानूसी तुज भास्करासी ।।१५।। ग्रहश्रेष्ठासी रवीसी । कर्मफलदात्या

तुजसी । कर्मफल धारकासी । कर्माकारा देवा नमन ।।१६।। नाना भेदधरासी । नानाभेद वर्जितासी । सदा अमृतस्वरूपासी । स्वात्मरूपा तुला नमन ।।१७।। परमात्म्या तुज नमन । अनंतरूपा तुज वंदन । जगजीवनरूपा अभिवादन । सत्या सत्यपाला तुला ।।१८।। दिवाकरासी त्रयीबोधासी । त्रयीकर्म प्रवर्तकासी । सर्व अहंकार मूळासी । अहंकार विनाशका नमन ।।१९।। ज्ञानदाता तू अससी । सर्व जगा प्रकाश देशी । ग्रहगोलां तेज देशी । अनादी महेशा तुला नमन ।।२०।। परेशा वृष्टिबीजासी । सर्वांच्या कालकर्मप्रवर्तकासी । मायाधारासी मायाचालकासी । नमो नमः पुनः पुन्हां ।।२१।। दिवानाथा किती स्तुति करावी । आत्माकारधरा तुझी भक्ति बरवी । ज्ञानप्रामाण्यें मानून घ्यावी । स्तवन केलें यथाशक्ति ।।२२।। जरी तुष्ट तूं देवेशा मजप्रत । तरी मज अमर करी जगांत । जें जें नाम रूपधर असत । त्यापासून मज मृत्यु नसो ।।२३।। त्रैलोक्याचें राज्य लाभावें । उत्तम आरोग्य लाभावें । सर्वांवरी प्रभुत्व मिळावे । संग्रामीं विजय अतुल्य ।।२४।। जगदीश्वरा जें जें इच्छित । तें तें लाभावें त्वरित । तुझ्या पादपद्माची भक्ति मनांत । दृढ होई ऐसें करी ।।२५।। ऐसें वरदान मागत । महादेव भास्करा तो नमित । उठून समीप बसत । विनयपूर्वक तो महासुर ।।२६।। सविता विस्मय वाटून म्हणत । प्रार्थिलें तें मिळेल तुज प्रत । तूं रचिलेलें स्तोत्र मजप्रत । प्रीतिवर्धक सर्वकामप्रद ।।२७।। ऐसें सांगून अन्तर्धान । सत्वर पावला सविता महान । स्वर्लोकीं जात परतून । दैत्यही हर्षित जाहला ।।२८।। स्वगृही तो परतत । मातापित्यासी वंदित । महासुर मित्रांसी भेटत । नंतर जाई शुक्रदर्शना ।।२९।। त्यास प्रणाम करित । मोहासुर सर्व सांगें वृतान्त । उपचारें त्यास पूजित । नंतर स्वगृहीं परतला ।।३०।। तदनंतर तो नगर निर्मित । विषयावासकनामा अद्भुत । शुक्र

तेथ निवास करित । परम तेजयुक्त जो ।।३१।। असुरांदीस कळतां वृतान्त । ते सर्व येती त्या नगरांत । त्या नगरांत वसती करित । मोहासुराच्या आज्ञेनें ।।३२।। चातुर्वर्ण्य समायुक्त । नगर त्याचें शोभत । अनुपम सर्व पृथ्वींत । पूर्ण भोगद सुखप्रद ।।३३।। दैत्यगण श्रेष्ठ येत । नंतर त्या स्थानाप्रत । शुक्राचार्य त्यांना प्रेरित । प्रणाम करिती ते सारे ।।३४।। प्रचंड चंड महाकाल । वीर्यशाली कालांतकारी प्रबल । अन्यही दैत्य नायक बाहुबल । अनेक जमले त्या स्थळीं ।।३५।। दैत्य संयुक्त ते एकत्र येत । मोहासुराच्या आज्ञेंत राहत । दैत्याधिपासी अभिषेक करित । शुक्राचार्य महर्षी ।।३६।। द्विजांसह राज्यावर । स्थापन करी मोहासुरासी अमर । सर्व दैत्य मुदित फार । होऊनी गेले स्वस्थानीं ।।३७।। जे मुख्य होते ते राहत । त्याच नगरींत सेवा लालसायुत । ऐशापरी मोहासूर होत । असुरांचा श्रेष्ठ नायक ।।३८।। त्याचा आश्रय घेऊन । महादैत्य हर्षित होऊन । महीवरती संचार भयहीन । अधिकार मदें राज्य करिती सदा ।।३९।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे तृतीये खंडे महोदरचरिते मोहासुरराज्याभिषेको नाम षष्ठोऽध्याय: समाप्त: । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय सहावा संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नम: । रवि कथा पुढती सांगत । मोहासुराची जी रोचक असत । मदिरेपासून तयास होत । पांच पुत्र महाबळी ।।१।। तेजस्वी ते पित्यासम होत । उग्र क्रूर बुद्धिमंत । पांचही शास्त्रपारंगत । अलंकार जणूं त्या नगराचे ।।२।। ऐसा कांहीं काळ लोटत । तेव्हां मोहासुर बोलावित । दैत्येशां सकलां ते येत । त्यांसी सांगे हितवचन ।।३।। नीतिसंयुक्त सुखयुक्त । प्रीतिवर्धक जे योग्य असत । मोहासूर

म्हणे तयांप्रत । दैत्याधिपांनो प्रचंडादी ।।४।। ऐकावें माझें हितप्रद वचन । जिंकूया आपण त्रिभुवन । जर तुमचे हितेच्छायुक्त मन । तरी मान्य हें करावें ।।५।। तुमचें सर्वांचें कार्य करीन । शुक्रपालित तुम्हीं महान । तैसें मज असुरेश्वरपदीं स्थापून । त्यानेंच धन्य मज केलें ।।६।। मीं अजेय जगीं असत । रवीच्या वरदानें संशयातीत । तेव्हां ते नमस्कार करून गर्जत । हर्षनिर्भर दैत्यगण ।।७।। महात्म्या महाभागास म्हणती । स्वामी योग्य विचार करिती । आपुल्या वाक्यामृतें आम्हांप्रती । तृप्ति आज वाटतसे ।।८।। तपस्तेज समन्वित । सम्यक् आपला विचार असत । आपुल्या आज्ञेनें त्रैलोक्यात । जिंकू सर्व प्राणिमात्रासी ।।९।। पराक्रमात न तुल्य आपणासम । सर्व विश्वांत इतुका महान । म्हणोनी विष्णु प्रमुख देवांसी अनुपम । अन्यांसही जिंकूं त्वरित ।।१०।। मोहासुर त्यांचें वचन ऐकत । आनंदानें त्यांस आज्ञापित । म्हणे सर्वही सुसज्ज व्हा त्वरित । दाखवूं आपला पराक्रम ।।११।। ते युद्धमार्गज्ञ दैत्येश करित । युद्धसज्जता अति त्वरित । नाना शस्त्रें घेऊन येत । यमधर्मा गिळण्या जणूं निघती ।।१२।। त्यांस पाहून मोहासुर हर्षित । दर्पे स्वयं रथ संस्थित । चतुरंग सैन्य त्याचें शोभत । कालरुद्रासम तो वाटे ।।१३।। सर्वांचा तो अध्यक्ष असत । भयदायक शस्त्र संयुक्त । पृथ्वीविजयीं संचार उद्यत । प्रथम वसुधातळावरी ।।१४।। त्याची अपार सेना संचलन करित । भूतल तेव्हां दबून जात । तेव्हां जी धूळ नभीं उसळत । तेणें झाकिलें सूर्यबिंब ।।१५।। त्या काळ रुप महादैत्यांसह । युद्ध करण्याचा कोणा संमोह? । त्यांचें तेज अति दुःसह । विप्रांनो जिंकती सर्वांसी ते ।।१६।। सप्तद्विपवती अवनी जिंकून । असुरोत्तम गेले नंतर चालून । विष्णु प्रमुख देवांवरी वेगें करुन । देव शरण जाती इंद्रासी ।।१७।। सेना आपुली सज्ज करित । इंद्रासहित जात ब्रह्मदेवाप्रत । परी

तो त्यांस नेत । शंकराकडे कैलासीं ।।१८।। शंकरासहित ते जात । केशवा जवळी वैकुंठात । केशव त्या सर्वांसी नेत । सूर्यलोकीं भास्कराजवळ ।।१९।। त्यांस पाहून भययुक्त । सुरेश्वरांसी भास्कर सांगत । नि:श्वास सोडून त्यांचे हित । मोहासुरा मीच वर दिला ।।२०।। माझ्या वरदानें तो समर्थ झाला । दैत्यपुंगव अजिंक्य जगाला । देवेंद्र मोहासुराला । जिंकू शकण्या अक्षम सारे ।।२१।। कर्मांचें फळ निश्चित । ते कोणासीही न चुकत । म्हणोनी आपण वनांत । राहूया सांप्रत कांहीं काळ ।।२२।। त्यागूं राज्यादिक भयग्रस्त । देह आपुले रक्षुं अक्षत । त्या मोहासुराचें पुण्य जेव्हां संपत । त्याचा मृत्यू तैं होई ।।२३।। अन्यथा लढूं जरी सांप्रत । तरी महादैत्य मारील बलयुक्त । प्रतापी दैत्य भुपेंद्र उत्साहयुक्त । देवेंद्रासह सर्वांसी ।।२४।। ऐसें माझें वाक्य ऐकत । रवि सांगे कथा ही अद्भुत । तेव्हां बृहस्पति मज म्हणत । सर्व नीतींत निपुण जो ।।२५।। देवाचार्य महायश देवांप्रत । हितकारक वचन उचित । भानूचा उपदेश सर्वथैव वाटत । सत्य हितकारक या समयीं ।।२६।। नंतर सर्वही देव म्हणत । उत्तम सांगितलें आमुचें हित । भानूचें वचन देवगुरू प्रशंसित । तेंच आम्हां प्रमाण असे ।।२७।। ऐसा निश्चय करून । देवेंद्रासह वनीं जाऊन । पर्वतांच्या गुहांत निवसन । करिती सारे भयग्रस्त ।।२८।। मोहासूर असुरांसहित । स्वर्गावरी आक्रमण करित । तेथें देव त्यांसी न दिसत । म्हणे पळाले मज भिऊन ।।२९।। परम हर्षित तो होत । स्वर्गीं विविध स्थानांवरी स्थापित । बहुविध बलाढ्य दैत्य बळवंत । आपण बैसला इंद्रपदीं ।।३०।। स्वर्गलोकींचे भोग उत्तम । सेवन करित असुर अनुपम । गंधर्व अप्सरा सेवाधर्म । आचरती भयें एकनिष्ठ ।।३१।। स्वर्गलोकांत जे निवसत । ते लोक असुरांची सेवा करित । स्वर्गलोक जिंकून सत्यलोकीं जात । मोहासुर दैत्यांसह ।।३२।।

तेथ सत्यलोकांत । पितामह ब्रह्मा त्यास न दिसत । शून्य सारें नगर पाहत। जाहला हर्षनिर्भर तैं ।।३३।। जिंकून लीलया सत्यलोक । निघाला जिंकण्या वैकुंठलोक । तेथ विष्णुही नसती निःशंक । असुरराज्य तेथ स्थापिती ।।३४।। नंतर कैलासीं प्रवेशत । तेथ शंकर न दिसत । कैलास शिवविवर्जित । जिंकला असुरें क्षणार्धांत ।।३५।। तदनंतर सौरलोकांत । महाअसुर तेव्हां जात । आदित्यहिन तो लोक पराजित । करिता झाला सत्वर ।।३६।। शक्तिलोक शक्तिहिन । तैसाचि सहजी जिंकून । दैत्येंद्र मुख्य तो हर्षोत्फुल्लमन । देवनगरीं स्थापी दैत्येंद्रा ।।३७।। कैलासांत अधिपति नेमत । उग्र नामक आपुला सुत । वैकुंठाधिपतित्व देत । क्रूर दैत्या त्या वेळीं ।।३८।। सौरलोकी मेधावीस नेमित । शक्तिलोकीं शोचना स्थापित । एक होता अति गर्वित । दुसरा युद्धलालस ।।३९।। सत्यलोकीं हरणासी नेमित । जो सर्वहारक प्रख्यात । प्रचंड मुख्यादींस करित । इंद्रलोकादींचे अधिपति ।।४०।। कालांतका पाताळीं पाठवित । तो शेषनागास भेटत । तेव्हां त्या दैत्यराजाप्रत । सामनिति शेष दाखवी ।।४१।। नागराजा त्याचें करी स्वागत । प्रभुत्व असुरांचें मान्य करित । करभार देऊन टाळित । युद्धात विनाश सर्वस्वाचा ।।४२।। ऐशा प्रकारें ब्रह्मांड जिंकित । दैत्यनायक मोहासुर अल्पकाळांत । महासुर आनंदे राहत । असुर दैत्यांसमवेत ।।४३।। नंतर आपुल्या मूळ नगरांत । परतून तो मोहासूर जात । विषयावासक नगर शोभत । राजाश्रयें त्या वेळीं ।।४४।। तेथ राहून ब्रह्मांडीं सत्ता । प्रस्थापित करी महत्ता । मोहासुरा वाटे कृतकृत्यता । म्हणे माझ्यासम मीच ।।४५।। अतुल भोग भोगित । सर्वोत्तम जे त्रैलोक्यांत । विषयप्रिय तो भयमुक्त । गर्वोद्धत दैत्यांसह ।।४६।। ऐसा मोहासूर विजय मिळवित । त्याचा प्रभाव त्रिभुवनांत । पुढिल कथा

अति अद्धुत । गणेश माहात्म्यपर असें ।।४७।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे तृतीये खंडे महोदरचरिते मोहासुरविजयवर्णनं नाम सप्तमोऽध्याय: समाप्त: । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय सातवा संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नम: । सूर्य कथा पुढें सांगत । मोहासूर अति गर्वित । देवांचा जीव घेण्या सतत । कटिबद्ध नाना प्रकारें ।।१।। त्यासाठीं परम दारुण असुर । पाठवून भ्रष्टवी चराचर । कर्ममार्गांत विघ्नें अपार । निर्मून खंडन करिती त्याने ।।२।। स्वल्प काळांत महीतल त्रस्त होऊन । झालें वेदोक्त कर्मविहीन । वर्णाश्रमविहिन । नष्ट झालें धर्ममूळ ।।३।। न स्वाहा न स्वधा मिळत । देवांसी तैसेच पितृगणांप्रत । महर्षींचा प्रभाव न पडत । मोहासुरमूर्ती दैत्य स्थापिती ।।४।। सर्वत्र मोहासूर मूर्ति पूजविती । त्याचे उत्सव रुढ करिती । उग्र दंड लाविती तैसे ताडिती । मोहासुरा जे न मानिती तयां ।।५।। तेव्हां मुनिगण समस्त । अत्यंत भ्रष्ट होत । कांहीं मेले काहीं वनांत । परम दारुण स्थिति त्यांची ।।६।। तेथ तें भयसंयुक्त । वेदोक्त क्रिया करित । परी सर्वत्र धर्मविच्छेद होत । दैत्यांस तेणें परम मोद ।।७।। देवगण सर्व भययुक्त । उपोषणें त्यांसी घडत । यज्ञकर्म बंद होत । आहुती कोण तयां देई ।।८।। तेव्हां ते विचार करित । मोहासुर विनाश कैसा होत । परी उपाय न कांहीं सुचत । देवांसी वा विप्रेंदांसी ।।९।। मी त्या वेळीं त्यांस म्हणत । सुरसत्तमांनो ऐका हित । अर्यमा मी तुम्हां सांगत । हितकारक ऐसा उपाय ।।१०।। ज्यास नामरूप असत । त्यापासुन मोहसुरा मृत्यु नसत । ही गोष्ट असे निश्चित । म्हणोनि अन्य उपाय ऐका ।।११।। गणेश्वराच्या हातून । दैत्य हा पावेल निधन । तो योगमय साक्षात गजानन । त्याचें

भजन करूया ।।१२।। तो देव निजलोकस्थ मारील । निजबोधें दैत्य सबल । म्हणोनि त्याचें स्तवन विमल । सुरेश्वर हो करूंया ।।१३।। माझें ऐसें ऐकून वचन । देव झाले हर्षित प्रसन्न । विष्णु आदी अनुमोदन । देती माझ्या विचाराते ।।१४।। देव म्हणती योग्य सांगत । सूर्य हा अधिक बुद्धिमंत । सर्वांना जीवनदाता संशयातीत । तो सांगतो तैसे करुया ।।१५।। नंतर देव विप्र तापस आराधित । गणनायकासी भक्तियुक्त । एकाक्षर विधानें मंत्र जपत । विघ्न निवारण्या निरंतर ।।१६।। आद्य मंत्र तो ध्यात हृदयांत । नाना तपें ते करित । उपोषणें करून तोषवित । ऋषि देव विघ्नेश्वरासी ।।१७।। ऐसी शत वर्षें जात । तेव्हां गणनायक तुष्ट होत । देवांसी वर देण्या प्रकटत । भक्तिभावें प्रसन्न तो ।।१८।। सौम्य तेजयुत गजानन । आखुवाहन तेजपूर्ण । चतुर्बाहुयुक्त मुदित मन । महोदर गणपति ।।१९।। एकदन्त विशालाक्ष शूर्पकर्णधर । सिद्धिबुद्धींचा पति उदार । शेषनाग नाभीवर । चिंतामणि त्याच्या गळ्यांत ।।२०।। नागयज्ञोपवीतयुक्त । ऐसा तो गजानन प्रकटत । देव देवर्षींच्या पुढ्यांत । तेव्हां त्यांना मोद झाला ।।२१।। यथाशास्त्र विधानें पूजा करित । भक्तिभावें त्यास वंदित । कर जोडोनि स्तुति करित । यथामति ते देव ऋषि ।।२२।। गणनाथासी महोदरासी । अनाथासी सर्वनाथासी । बुद्धिसिद्धींच्या नाथासी । अनादीसी नमन असो ।।२३।। ढुंढीसी हेरंबासी । स्वभक्ता सर्वदात्यासी । चतुर्बाहुधरासी । शूर्पकर्णासी नमन असो ।।२४।। लंबोदरासी विघ्नेशासी । विघ्ननिवारणासी गजाननासी । आखुवाहनासी महात्म्यासी । एकदन्तासी नमन असो ।।२५।। शेषनाभिस्थितासी । महागणपतीसी सर्वकारणासी । भक्त वांछिती ज्या विघ्नहरासी । मायाश्रयासी नमन असो ।।२६।।

मायाधारकासी महाभुजासी । अभक्तांच्या इच्छा दाहकासी । योगपतीसी योगदात्यासी । अव्ययासी नमन असो ।।२७।। स्वानंदवासीसी योगाकारासी । नमन आमुचें महोदरा तुजसी । सर्वांच्या जठरांत तू राहसी । भोग भोगिसी नानाविध ।।२८।। परी तुझ्या उदरांत भोक्ता नसत । अन्य कोणी भोगरत । म्हणोनी महोदर प्रख्यात । देह आत्म्यांत बोधब्रह्म तूं ।।२९।। तुझें रूप ज्यासी ज्ञात । ऐसा कोण असे जगांत । परी भक्तवत्सला तूं आमच्या पुढ्यांत । प्रकटलास हें महाभाग्य ।।३०।। भक्तवत्सल तू प्रकटलास । आम्हां कृतार्थ केलेस । धन्य आम्ही तूं दिसलास । सर्वोदर विलासकर ।।३१।। महोदर तूं प्रसन्नात्मा । साक्षात् ब्रह्मपति परमात्मा । गणाधीशा स्तुति करितां आत्मा । वेदादींचा जेथ हरला ।।३२।। तेथ आम्हीं काय करूं स्तुति । योगगम्या सनातना आम्ही मूढमती । परी तुझ्यापुढें प्रणाम करून चित्तीं । सदैव तुजला स्मरण करूं ।।३३।। रवि म्हणे ही स्तुति ऐकत । गणेश तेव्हां सुतोषित । भक्तिभावें नियंत्रित । म्हणे तयांसी वर मागा ।।३४।। सर्व देवेशांनो मागा ईप्सित। मुनींनो सांगा इच्छित । देईन सर्वही भक्तितुष्ट । तुमचें स्तोत्र मज प्रिय सदा ।।३५।। जो हें नित्य वाचील । अथवा जो हे ऐकेल । त्यास सर्वसिद्धि लाभतील । यात संदेह कांहीं नसे ।।३६।। गणेशाचें वचन ऐकत । देव मुनिगण हर्षभरित । प्रणाम करुन तया प्रार्थित । देवदेवेशा जर तूं प्रसन्न ।।३७।। तरी तुझी भक्ति अविचल । दृढ करि चित्तांत विमल । मोहासुर माजला झाला सबल । तयासि हनन करावें ।।३८।। त्या दुष्टानें स्थानभ्रष्ट केलें । आम्हां सर्वांसी धिक्कारिलें । कर्महीनत्व मुनींना आलें । ब्रह्मांड जिंकिलें मोहासुरें ।।३९।। लोक झाले अति दुःखित । त्यांना करावें पुन्हा सुखित । मोहसुरा मारून जगांत । गर्वाचें घर खाली करावें ।।४०।। स्वामी

आम्हीं करितों नमन । मोहासुराचें करावें हनन । वांछा आमुची पुरवून । भक्तवात्सल्य प्रकट करा ।।४१।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे तृतीये खंडे महोदरचरिते देवर्षिवरप्रदानं नामाष्टमोऽध्याय: समाप्त: । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय आठवा संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नम: । सूर्य कथा पुढती सांगत । महोदर क्रोधसमायुक्त । परशु आदी आयुधें घेत । प्रतापवान द्विज हो स्वकरी तैं ।।१।। मूषकावरी बसत । देवर्षिगणांच्या सहित निघत । मोहासुरा मारण्या जात । त्याच्या नगरीं त्वेषानें ।।२।। दैत्याधिपांसमवेत । मोहासुर बसला होता सभेंत । अकस्मात नारद तेथ जात । गानपरायण देवर्षि ।।३।। त्यांस पाहून मोहासुर । विनयें करी नमस्कार । आसन देउनी पूजा उपचार । करूनी नंतर विचारी ।।४।। म्हणे मुने कांहीं विचित्र । पाहिलें का आपण परत्र । दैत्याचा प्रश्न ऐकून सुसूत्र । सांगे कथा तयासी ।।५।। जरी पुण्य पावन कथा असत । दैत्यास ती विषासमान वाटत । नारद म्हणे हर्षयुक्त । मोहासुरा ऐक हितवार्ता ।।६।। मी जें आश्चर्य पाहिलें । तें सांगेन तुज सगळें । देवांनी असे विनविलें । महोदरासी तुझ्या वधार्थ ।।७।। त्यांनी केले तप । ध्यान पूजन अमाप । तोषविला देव सुरूप । महोदर एकदन्त ।।८।। तो मूषकारूढ होऊन । तुझ्यावरी येतसे चालून । आता आहे दहा योजने । दूर तुझ्यापासुनी ।।९।। ऐसे सांगून धरी मौन । दैत्यराज झाला मनीं उद्विग्न । परी उग्र दु:ख मनीं ठेवून । नारदास विचारी तो ।।१०।। नारदमुने ऐका वृत्तान्त । मज मृत्यू नसे जगांत । जो कोणी नामरूप युक्त । ऐशा कोणापासुनी ।।११।। तेव्हां तो देवरक्षक महोदर । जरी आहे नामरूपधर । तो मज काय करील बध्द । मीच

त्यास मारीन ।।१२।। मोहासुराचें तें वचन । ऐकून म्हणे नारद हसून । महायोगी मोहासुरा संबोधून । दैत्याधिपा ऐक हित ।।१३।। महोदर नसे नर । तैसाची तो ना कोणी असुर । देव अथवा गंधर्व । नसे तो कोणी यक्ष राक्षस ।।१४।। नामरूपविहिन वेदान्त । ब्रह्म जें असें ख्यात । तो नामरूपाचा निर्माता येत । मोहासुरा तुज मारावया ।।१५।। त्याचा क्रोध भयंकर । तो सर्वथैव असे अमर । म्हणोनि त्यास शरण सत्वर । जाशील तर वाचशील ।।१६।। तुज सुख प्राप्त होईल । हें ऐकून दैत्यराज व्याकुल । योगज्ञा नारदा विनवी सबल । भ्रमनाश माझा करावा ।।१७।। जरी महोदर नामरूपहीन । तरी देहधारी कैसा तो अजून । नामरूप समन्वित म्हणून । वर्णन आपण करिता त्याचें ।।१८।। नामरूपमय ब्रह्म असत । नामरूप विवर्जित । योगभावें ते सर्वत्र स्थित । यांत संशय कांहीं नसे ।।१९।। हा आपुला हा पर । ऐसा मोह तेथ ना भ्रमकर । देवदैत्यादी भेदासी ना थार । सर्वत्र समस्थित ब्रह्म ।।२०।। हा महोदर जरी ब्रह्म असत । तरी देवपक्षपाती का होत? । दैत्यांच्या वधाचा करित । विचार कां तो सममती? ।।२१।। विप्रा हें वाटे विपरीत । आपुलें वचन सांप्रत । संशय माझ्या मनांत । प्रभो तो दूर करावा ।।२२।। त्या महोदराचें अन्य चेष्टित । सांगावें कैसें त्याचें रूप असत । कैसा स्वभाव पराक्रम वर्तत । तें सर्व सांगा मजला ।।२३।। तो महोदर कुठें निवसत । त्याचें ब्रह्मरूप कैसें असत । हें सर्व विस्तारें मजप्रत । करुणानिधे ज्ञान द्यावें ।।२४।। सूर्य कथा सांगें पुढती । महायोगी स्मरे गणपति । भक्तिभावें आपुल्या चित्तीं । नंतर त्यासी सांगतसे ।।२५।। मोहासुरा महाभागा असत । मती तुझी योगिसंमत । योगरूपाविषयीं ऐकण्या वांछित । म्हणोनि तुज सांगेन सारें ।।२६।। एकमनें ऐक सांप्रत । ढुंढीचें योगप्रद चरित । नामरूपमय वर्तत । जग सर्व हें चतुर्विध ।।२७।।

नामरुपविहीन जें असत । तें देहरूप जगाचें हित करित । त्या दोघांच्या संयोगे होत । दैत्येंद्रा बोध सर्व संमत ।।२८।। तें ब्रह्म पूर्णभावें संस्थित । योगवाचक तें ख्यात । दैत्यपुंगवा जाण तूं सांप्रत । तोच हा आला महोदर ।।२९।। देहदेहीकृत भोग उदरांत । स्वस्व आनंदपर जो समस्त । सर्वत्र जो विलसत । मुक्तभोग त्यास म्हणती ।।३०।। जरी उदरभोग भोगित । बाह्य परायण जीव जगांत । ते होती मरणयुक्त । स्वल्पकाळेंचि दैत्येंद्रा ।।३१।। स्वस्व आनंदमय भोग । सर्व भावें भोगितां सुयोग । सर्व ब्रह्मे तशी जगें सुभग । निश्चित होती विश्रांत ।।३२।। विश्वीं भिन्न भोग आत्म्यांत । अमृतात्मक जो असत । एकभावमय भोगयुक्त । ऐसे द्विविध वर्ततीं ।।३३।। देहांत भिन्न असे जठर । आत्म्यांत जें संमत उदर । एकभावात्मक तें अक्षर । जाण दैत्या योगसेवेनें ।।३४।। जरी विश्व आणि आत्मा योगविहीन । कां करिता विशेष यत्न । त्याचें सांगतों तुज निदान । नाना रूपधर विश्व असे ।।३५।। तें विश्व भोगार्थ जन्मत । नामरूपविहिन देही असत । विश्वासाठीं देहीं संजात । ऐसा हा कार्यकारण भाव ।।३६।। भोगाची जरी इच्छा नसेल । तर द्विविध का होईल । म्हणोनि दैत्येंद्रा प्रबल । भोगयुक्त उभयही ते ।।३७।। विश्वात्म्याच्या उदरात । गणनायक असे स्थित । म्हणोनि महोदर नामें ख्यात । महात्मा तो जगांत ।।३८।। द्विविधांचे जठर असत । स्वस्वभोग परत्वें ख्यात । स्वल्पवाचक महामते वर्तत । ऐसें रहस्य जाणावें ।।३९।। सर्वांच्या उदरांत सदा स्थित । विशेषत्वें तो अविरत । म्हणोनि महोदर ऐसें वर्णित । वेदवादी तयासी ।।४०।। विश्व त्याचें देहमय ख्यात । आत्मवाचक मस्तक असत । त्यांच्या योगें जगी ज्ञात । गणेश तोची गजानन ।।४१।। ज्यापासून सकळ उत्पन्न । ज्याच्यांत अन्ती लय पावून । दैत्यनायका तेची प्रसन्न । गजरूप तूं जाणावें ।।४२।। विश्वात्मे दोन

निर्मित । त्यांपासून ज्ञानार्थ जगांत । तपानें जेव्हां आराधित । देव देहधारी तैं जाहला ।।४३।। त्याचा प्राकृत देह नसत । दैत्यपा सर्वांहून तो भिन्न असत । भुक्तिमुक्तिसाठी घेत । स्वेच्छेनें देहधारणा तो ।।४४।। स्वसंवेद्य योगानें लाभत । गणनायक स्वसंवेद्य नगरांत । सिद्धि भ्रांतिप्रदा माया असत । तिच्या प्रभावें भ्रम जनांसी ।।४५।। बुद्धि भ्रांतिधरा ख्यात । चित्तरूपा ती विशेषत: असत । पंचविध आहे चित्त । त्याचें ऐश्वर्य भ्रमात्मक ।।४६।। त्याचा त्याग करित । तेव्हां योगज्ञा शांति लाभत । योगसेवेनें सतत । ऐसे सत्य जाण तूं ।।४७।। सिद्धिबुद्धिंचा स्वामी प्रख्यात । महोदर हा आला असत । महादैत्या शरण जा तयाप्रत । भजन करी तयाचें ।।४८।। अन्यथा तुजला मारील निश्चित । सुरासुरमय विश्व तो निर्मित । स्वस्वधर्मसमायुक्त । त्यानें खेळतो विघ्नप तो ।।४९।। जेव्हां देव दैत्यांचा विनाश करिती । तेव्हां हा सिद्धिप्रद दैत्यांप्रती । देहधारी होऊनी जगतीं । असुरांसी वरदान देत असे ।।५०।। परी देवविनाश इच्छिति । ते दैत्य जेव्हां दुष्टमती । तेव्हां हा महोदर जगतीं । पक्षपाती होत देवांचा ।।५१।। दैत्यांचे तो हनन करित । दुष्टवृत्तींचा नाश करित । धर्मनिष्ठांचा पक्ष घेत । महोदर देव गजानन ।।५२।। देव संख्यायुत वृद्धिक्षयहीन । दैत्य अपार वृद्धिक्षययुक्त दुर्मन । त्या दोघांचेंही करी हनन । अधर्म जेव्हां ते आचरती ।।५३।। स्वधर्मात जेव्हां रत । होती हे सुरासुर जगांत । तेव्हां गणेश योगरूप निवसत । ब्रह्मनायक जठरांत ।।५४।। ऐसें हें सर्व कथन केलें । दैत्या गणेशरूप भलें । ब्रह्मभूतापासून उपजलें । जगद्ब्रह्म अंशांतून ।।५५।। म्हणोनि त्यास जा शरण । जरी टाळूं पाहसी मरण । भोग मोक्षप्राप्तीकारण । जीविताची आशा जरी ।।५६।। ऐसें बोलून अन्तर्धान । नारद मुनि पावले करुणाघन । अविरत करी तो वीणावादन । गणेश गानीं निमग्न जे

।।५७।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे तृतीये खंडे महोदरचरिते मोहासुरज्ञानप्रदानं नाम नवमोऽध्याय: समाप्त: । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय नववा संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नम: । सूर्य कथा पुढती सांगत । नारदमुनी परतूनि जात । तेव्हां मोहासुर हर्षित । विचार करी स्वचित्तीं ।।१।। जाऊन बैसला एकांतांत । गणेशाचें ध्यान करित । महोदराचा महिमा मनांत । जाणून हर्षित जाहला ।।२।। शुक्रासन्निध जाऊन । तयासी करी सर्व कथन । आपुल्या गृहासी परतून । गणेशावरी मोहित झाला ।।३।। मोहासूर झाला मोहवर्जित । त्या समयीं विष्णु तेथें येत । सामोपचारार्थ पाठवित । गणराज तेथ तयासी ।।४।। केशवाचा मान करुन । मोहासुर करी तयाचें पूजन । महादैत्य प्रतापवान । शुभ आसनीं बैसवोनी ।।५।। महाविष्णूस विचारीत । म्हणे येथें का आलासी सांप्रत । सांग आपुलें इच्छित । सफल मी तें करीन ।।६।। तेव्हां विष्णु तयासी म्हणत । महोदर समीप आला असत । धर्मरक्षणीं तत्पर जगांत । त्यानें मज पाठविलें ।।७।। देव मुनींनी युक्त । सामोपचार करण्या तुजप्रत । मित्रभाव तो वांछित । दैत्यनायका तुझ्यासवें ।।८।। देहदेहीमय ब्रह्म । गणनायक हा अनुपम । तत्त्वदर्शी मुनी सांगती मर्म । ज्या महोदर देवांचें ।।९।। सर्वांच्या उदरीं निवसत । भोग भोगी जो समस्त । म्हणोनि महोदर नाम ख्यात । स्वल्पोदर आम्हीं सारे ।।१०।। नगरापासून दशयोजन । आला असे महोदर महान । देव विप्रादी करिती स्तवन । त्यानें निरोप सांगितला ।।११।। तोच मी तुज सांगेन । सर्वभावज्ञा ऐक वचन । महोदराची आज्ञा मानून । जीवन करी सुखपुर्ण ।।१२।।

विरोधभाव सोडून । दैत्येन्द्रा भूषवी आपुलें स्थान । देवांसी हविर्भाग मिळून । ब्राह्मण होवोत कर्मनिष्ठ ।।१३।। असोत लोक वर्णाश्रमयुत । तैसेचि ते दुःखवर्जित । व्हावें तूं सामभावयुक्त । अन्यथा युद्धासी सज्ज व्हावें ।।१४।। ऐसें हें गणेशाचें वचन । महाभागा तूं मानून । मित्रत्व भाव स्विकारून । कल्याण साधी आपुलें ।।१५।। सूर्य सांगे वृत्तान्त । विष्णूचें वचन ऐकून म्हणत । मोहासुर प्रसन्नचित्त । महाबळी तो दैत्येंद्र ।।१६।। विष्णो तूं सांगसी हित । सुखकारक जें योग्य असत । तैसेचि मी करीन त्वरित । महोदरासी तोषवीन ।।१७।। ऐसें बोलून विष्णूप्रत । दैत्यांसी तो बोलवित । विष्णूचा उपदेश कथन करित । तेव्हां दैत्य क्रुद्ध झाले ।।१८।। मोहासुराचें ऐकून वचन । निर्णय त्याचा जाणून । पाताळांत करिती गमन । भयव्याकुळ ते सारे ।।१९।। शुक्राचार्यासहित । मोहासुर नंतर प्रतापवंत । विष्णूसह गणेशासी शरण जात । विप्रांनो ऐका ही कथा ।।२०।। महोदरासमीप जाऊन । दैत्येन्द्र करी वंदन । भक्तिभावें करून पूजन । स्तुतिस्तोत्र गाई त्याचें ।।२१।। ब्रह्मरूपासी महोदरासी । सुरूपासी भोगभोक्त्यासी । देहदेहीमयासी । त्रिनेत्रधरासी नमन माझें ।।२२।। मूषकारूढ देवासी । चतुर्भुजासी देवपतीसी । अनादीसी सर्वादि रुपासी । विनायकासी नमन असो ।।२३।। हेरंबासी दीनपालासी । गणेशासी निजानंदपतीसी । ब्रह्मनायकासी ब्रह्मभूतासी । सिद्धिबुद्धि प्रदात्यासी नमन ।।२४।। ब्रह्मासी ब्रह्मदात्यासी । योगशांतिमयासी योगपतीसी । योग्यासी योगदायकासी । एकदन्तासी नमन असो ।।२५।। सिद्धिबुद्धिपतीसी । नाथासी शूर्पकर्णासी । शूरासी सर्वांस मोहकर्त्यासी । भक्तांसी सुखदायका नमन ।।२६।। वीरासी अभक्तां विघ्नकर्त्यासी । मायावीसी मायाधारासी । मायेनें भ्रांतिदायकासी । महोदरासी नमन असो ।।२७।। जेथ वेदही मौन

पावलें । तिथें माझे शब्द कैसे पुरले । तरी गणाध्यक्षा मी गाईलें । भक्तिभावें तुझें स्तोत्र ।।२८।। धन्य माझी मातापिता जगांत । ज्ञान तप स्वाध्याय समस्त । धन्य देवेशा शरीर असत । जेणें पदांबुज पाहिले तुझें ।।२९।। ऐसें बोलून करी नमन । महोदर बोले वचन शोभन । महासुरा वरदान । माग मनोवांछित ।।३०।। तुझ्या भक्तीनें मोहित । देईन मी समस्त । तुज मारण्या आलों क्रोधसंयुत । परी शरणागता न मारी मी ।।३१।। तूं रचिलेलें स्तोत्र वाचित । अथवा जो हें ऐकत । त्याचा मोह नष्ट होत । भुक्तिमुक्ति त्यांस मिळे ।।३२।। धन्यधान्यादिक त्यांस लाभेल । पुत्रपौत्रादींचें सुख विमल । गणेश वरदान ऐकून प्रबल । मोहासुर हर्षित जाहला ।।३३।। हात जोडून म्हणे वचन । महोदरा जरी तूं प्रसन्न । तरी तुझ्या पादपद्मीं माझें मन । दृढ होईल ऐसें करी ।।३४।। तुझ्या भक्तांचें मित्रत्त्व लाभावें । ऐसे वरदान मज द्यावें । मोहासुराचें वाक्य हें बरवें । ऐकून तोषला महोदर ।।३५।। तयासी म्हणे महोदर । माझी दृढ भक्ति समग्र । तुझ्या मनीं होईल स्थिर । निःसंशय मोहासुरा ।।३६।। कर्मज्ञानादि भावांत । जेथ माझें पूजन होत । तैसेचि स्मरण अविरत । तेथ भोगभोक्ता होशील ।।३७।। आपुल्या स्थानीं राहून । स्वधर्माचें करी पालन । माझ्या भक्ता मोहविहिन । करी सर्वदा मोहासुरा ।।३८।। त्याची आज्ञा मानून । मोहासुर जाई परतून । शांतियुक्त मनीं होऊन । गणेशचिंतनीं निमग्न झाला ।।३९।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे तृतीये खंडे महोदरचरिते मोहासुरशांतिवर्णनं नाम दशमोऽध्यायः समाप्तः । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय दहांवा संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नमः । सूर्य कथा पुढती सांगत । मोहासुर जेव्हां स्वगृहीं परतत । होऊनिया शांतचित्त । देवमुनी महोदरा पूजिती ।।१।। पूजा करुनी भक्तिसंयुत । गणेशासी नमन करित । विविध प्रकारें स्तुति करित । हर्षयुक्त ते देवऋषि ।।२।। अमित विक्रमा निरंजना । अमेयमायिका गजानना । गणेश्वरा मायिकामोहना । नमन तुजला वारंवार ।।३।। मनोवाणी विहीना । मनोवाचायुक्ता गजानना । अयोगसंयोगमया ढुंढे वंदना । महोदरा तुज वारंवार ।।४।। विदेहरूपासी बोधकासी । सोऽहंपद भोक्त्यासी । सुबिंदु आत्मक देहगासी । महोदरा तुज नमन असो ।।५।। गणेशरूपासी सुषुप्तिकासी । सूसूक्ष्मासी जागृतासी । हरीश ब्रह्मादिक संस्थितासी । महोदरा तुज नमन असो ।।६।। शुभ अशुभ आकार धारकासी । शुभअशुभांत प्रथम पूज्यासी । शुभाशुभकर्मांत सिद्धिप्रदासी । महोदरा तुज नमन असो ।।७।। कालप्रकाशरुपासी । कर्त्यासी क्रियास्वरूपासी । भानूसी शक्तिप्रदात्यासी । महोदरा तुज नमन असो ।।८।। यम चंद्र वायुरूपासी । कुबेरासी पुरंदरासी । शिवरूपासी वह्निरूपासी । महोदरा तुज नमन असो ।।९।। नैर्ऋतासी अनंतरूपासी । प्रजापतीसी पाशधरासी । जलेशकायासी दिशामयासी । महोदरा तुज नमन असो ।।१०।। दिगीशपालासी सुरासुरमयासी । सुरासुर आकारधारकासी । पिशाच्च गंधर्वमयासी । महोदरा तुज नमन असो ।।११।। धरास्वरूपासी जलप्रकाशासी । जलस्वरूपासी तेजासी । वायूसी आकाशमयधारासी । महोदरा तुज नमन असो ।।१२।। अनादि मध्यान्त विहारकासी । सदा आदि मध्यान्तमयासी । तत्त्वप्रकाशासीं तत्त्वमूर्तीसी । महोदरा तुज नमन असो ।।१३।। नरासी वर्णाश्रम संस्थितासी । द्विजस्वरूपासी नराधिपासी । वैश्य शूद्रासी अंतिमासी । महोदरा तुज नमन असो ।।१४।। गुरूच्या आधीन स्वरूपासी । गृहस्थ वानप्रस्थ

परिव्राजकासी । तैसेचि वर्णाश्रमहीन योग्यासी । महोदरा तुज नमन असो ।।१५।। वृक्षलता तृण संस्थितासी । धराधराकारमयासी । पशुस्वरुपासी पक्ष्यासी । महोदरा तुज नमन असो ।।१६।। रसस्वरूपासी रसाधिपासी । अन्नरूपासी जीवनासी । चराचराकारमय नागासी । महोदरा तुज नमन असो ।।१७।। अंकुशादि सुचिन्ह शोभितासी । मूषक ध्वजासी मूषकवाहनासी । त्रिनेत्रधरासी शूर्पकर्णासी । महोदरा तुज नमन असो ।।१८।। स्वानंद लोकाधिपासी । देवदेवासी परमात्म्यासी । सिद्धिबुद्धि प्रभावासी । महोदरा तुज नमन असो ।।१९।। एकदन्तासी चतुर्भुजासी । आदिपूज्यासी वस्त्रभूषितासी । प्रमोदामोदादि गणस्तुतासी । महोदरा तुज नमन असो ।।२०।। सदा इक्षु समुद्रामृत करकमलासी । गणेशासी हेरंबासी । भक्तपोषकासी विकारहीनासी । महोदरा तुज नमन असो ।।२१।। विश्वोदरीं प्रवेश करुन । भोग भोगिसी सुबोध मन । विश्वमया अल्पोदरा हो प्रसन्न । महोदरा तुज नमन असो ।।२२।। देवमुख्य जे भोग भोगितीं । त्यांच्या रूपें ते तुलाचि पावती । तूंच सुखभोग भोगिसी जगतीं । महोदरा तुज नमन असो ।।२३।। ऐसी स्तुति ते करित । सुरऋषि भक्तिरसयुक्त । आनंदानें ते नाचत । रोमांच उठले सर्वांगीं ।।२४।। कंठ आला दाटून । डोळ्यांतून आनंदाश्रूं पतन । तयांसी म्हणे गजानन । भक्तवत्सल महोदर ।।२५।। देवांनो, मुनिगणांनो मागावें । जें जें इच्छित स्वभावें । तें सर्वही मी पूर्ण करावें । भक्तिस्तोत्रें संतुष्ट मी ।।२६।। गणेशाचें वचन ऐकून । सुरऋषि म्हणती हर्षित मन । पुनःपुन्हा प्रणाम करुन । गणनाथा तुझी भक्ति देई ।।२७।। तुझ्या भक्तीनें व्हावें तृप्त । मोहासुरा केलेंस शांतियुक्त । दुष्ट असुनी झाला पुनीत । सर्व जगाचें पालन केलें ।।२८।। आता आम्हां तापहीन । केलेत गजानन होऊन प्रसन्न । अनाथांचा नाथ तूं मनमोहन । प्रणाम

करितों मनोभावें ।।२९।। त्यांसी वरदान देऊन । गणेश पावले अन्तर्धान । देवमुनि जाती परतून । आपापल्या सदनांत ।।३०।। लोक झाले स्वधर्मरत । त्यांचा संताप दूर होत । जगासी मोहहीन करित । मोहासुरासी देत शांति ।।३१।। ऐसा हा प्रतापी महोदर । तयाचे विविध अवतार । वर्णन करण्या अशक्य समग्र । चरित्र त्याचें अद्भुत ।।३२।। सीतावियोगें जेव्हां आर्त । राम तेव्हां शरण जात । अन्तीं महोदर शांत करित । भक्ति त्याची पाहुनि ।।३३।। सीतेसहित भजन करित । महोदराची मूर्ति स्थापित । श्रीराम दक्षिण दिशेंत । प्रसिद्ध झालें तें स्थान ।।३४।। ऐसें हें महोदराचें चरित । मोहनाशक शांतिप्रद पुनीत । द्विजांनो सांगितले तुम्हांप्रत । पाठका वाचका शांति लाभे ।।३५।। भुक्तिमुक्ति लाभेल । संशय मनींचा नष्ट होईल । सूर्य म्हणे विप्र विफल । मजला परात्पर मानिती जें ।।३६।। तयांसी स्वल्पयोग ज्ञान । ऐका ऐसें माझें वचन । म्हणोनि भक्तिभावें भजन । करितों मी गणेशाचें ।।३७।। ऐसें हें माझें चरित । सांगितलें तुम्हां समस्त । वालखिल्य मुनींनो सुविहित । मनन करा तयाचें ।।३८।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे तृतीये खंडे महोदरचरिते महोदरांऽतर्धानं नामैकादशोऽध्याय: समाप्त: । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय अकरांवा संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नम: । मुद्गल म्हणती दक्ष प्रजापतीस । सुर्ये सांगितलें सुरस । महोदर कथानक वालखिल्यांस । ऐकून विस्मित ते झाले ।।१।। धारण करिती मानसांत । गणेश सुशांतिप्रद योगरूप युक्त । भानूनें बोधितां संदेह नसत । अल्पही त्यांच्या मानसीं ।।२।। हर्षयुक्त होऊन विचारिती । वालखिल्य ते सूर्याप्रती । महोदराचें चरित्र प्रीति ।

पुनरपि भक्तिभावानें ।।३।। वालखिल्य सूर्यासी म्हणत । सूर्या तूं धन्य जगतांत । योगशांति प्रकाशक बलयुक्त । बोध आम्हांसी आपण केला ।।४।। गणेशाचा धन्य जन्म । कथा त्याच्या उत्तम । महाप्रभो त्या ऐकून । मानसीं संतुष्ट जाहलों ।।५।। महाभागा तूं सर्वज्ञ असशी । साक्षात् गणपति वाटसी । आत्माकारें सूर्य तूं जगासी । यांत अद्भुत कांहीं नसे ।।६।। आतां देवेशा आम्हांप्रत । सांगावां समग्र वृत्तान्त । राम केव्हा भजन करित । गणपतीचें भक्तिभावें ।।७।। धन्य ते पुरुष जगांत । जे गणेशकथांत मग्न होत । तैसेचि जे त्या सांगत । ऐकतां योगशांति लाभ ।।८।। मुद्गल म्हणती दक्षाप्रत । वालखिल्य ऐसें जेव्हां विनवित । रविदेव होऊन हर्षित । म्हणे सांगेन तो वृत्तान्त ।।९।। येथ इतिहास पुरातन । नारायण मार्कंडेय संवाद पावन । मृकंडाचा सुत महान । तोचि मार्कंडेय मुनी ।।१०।। मौजींबंधनानंतर आचरित । परम तप तो ब्रह्मचर्ययुत । वेदशास्त्रज्ञ मोक्ष वांछित । गायत्री जप विशेष करी ।।११।। अयुत वर्षें ऐसीं जात । तेव्हां त्याच्या आश्रमांत । पार्वतीसहित शंकर येत । गणांसह आपुल्या ।।१२।। निमग्न विष्णूच्या ध्यानांत । मार्कंडेय बसला होता निवान्त । त्यांस आगमन न कळत । महेशाचें त्या वेळीं ।।१३।। तेव्हां शिव काय करित । योगमायाबळें प्रवेशत । मार्कंडेयाच्या हृदयांत । आश्चर्यकारक कृत्य तें ।।१४।। विष्णूस लोपवी हृदयांतून । शंकरास पाहून विस्मितमन । सोडोनियां त्वरित ध्यान । प्रणाम करी तो शंकरासी ।।१५।। अथर्वशीर्षें स्तवन करुन । शंभूस भक्तिभावें पूजून । तयाच्या पुढती उभा राहून । प्रणाम करी पुनरपि ।।१६।। महादेव तयासी म्हणत । वर माग मनोवांछित । तुझ्या तपें मीं संतुष्ट असत । गायत्रीजप माहात्म्यें ।।१७।। गायत्री असे वेदमाता । ॐकार हा म्हणती पिता । ॐकारापासून तत्त्वता । तापसोत्तमा जन्म आमुचा ।।१८।। म्हणोनि

गायत्रीच्या जपानें होत । संतोष माझ्या मनांत । गंभीर स्तुतीनें मी सुप्रीत । वांच्छित विप्रा देईन ।।१९।। यांत कांही संशय नसत । ऐसें शिवाचें वचन ऐकत । तेव्हां महामुनी त्यासी म्हणत । भक्ति तुझी दे मजला ।।२०।। संसार सागरांतून मुक्ति । मिळावी ही इच्छा चित्तीं । तेव्हां आपुल्या भक्ताप्रती । शिव वरदान देता झाला ।।२१।। माझी भक्ति दृढ होईल । शाश्वत मुक्ति तुज लाभेज । सप्तकल्प जीवन होईल । इच्छिसी तें तें सफल होय ।।२२।। ऐसें वरदान देऊन । शक्तिसहित पावला अन्तर्धान । मार्कंडेय खिन्न मन । महर्षींनो बसला तेव्हां ।।२३।। गायत्री रूपधारी मंत्रशक्ति । देवता शंभुरूपा ती कल्पिती । शैवमार्गे शंभूची महती । मार्कंडेय मुनी गाती ।।२४।। कलात्मक महेशान । तैसाचि तो मोहहीन । तेव्हां शिवशक्ति माहात्म्ययुक्त पावन । पुराण सर्वसिद्धिकर त्यासी सांगितलें ।।२५।। ऐसा बहुकाळ जात । तेव्हां नरनारायण उभय जात । मार्कंडेयाच्या आश्रमांत । परमेश्वर देवर्षींस भेटण्यासी ।।२६।। वालखिल्य सूर्यास विनविती । महाभागा वर्णावी त्यांची महती । परमेश्वरसंज्ञ ते असती । नरनारायण कां जगांत? ।।२७।। भानू तयांसी सांगत । माझा पुत्र धर्म आचरित । विष्णूचे तप अविरत । तेणें तोषला विष्णुदेव ।।२८।। कीर्ति पत्नीसहित । विष्णुसी धर्म विनवित । आमुचा पुत्र व्हावे म्हणत । त्यानें तें मान्य केलें ।।२९।। नरनारायण तयांचे सुत । नर जीवमय ख्यात । परमात्मा नारायण असत । त्यांच्या योगें वैष्णवब्रह्म ।।३०।। म्हणून मी नरनारायणासी म्हणत । परमेश्वर ऐसें आदरयुक्त । धर्माची आज्ञा घेऊन जात । ते दोघे निमिषारण्यीं ।।३१।। तेथ ते परम तप आचरित । स्वयं विष्णु तेथ अवतरत । त्यांस पाहून दोघे स्तवित । केशवासी स्तोत्रांनी ।।३२।। भक्तिभावें प्रणाम करिती । महाविष्णू तयांसी म्हणती । महामुनींनो जें जें चित्तीं । तें तें सर्वही

मागून घ्या ।।३३।। तेव्हा ते दोघे केशवाप्रत । परम धार्मिक नम्रत्वें प्रार्थित । महाभागा सर्व शांतिकर जगांत । ऐसा योग सांगावा ।।३४।। महायोगी गाणपत्य प्रिय सांगत । शांतिप्रद योग तयांसी हर्षित । चित्त पंचविध ख्यात । त्याचें ऐश्वर्य मायावी ।।३५।। त्याचा त्याग करून । शांतियोगाची प्राप्ति पावन । जें जें चित्त वांछी उन्मन । तें तें योगरूप करावें ।।३६।। तदाकार समाधीनें ऐसे करावें । जें जें चित्तासी न ज्ञात । तें तें मानावें निवृत्तिवाचक । योगरूप करावें योगसेवेनें ।।३७।। चित्तांत चिंतामणि विराजत । नित्य चित्तचालक तो असत । त्याचें भजन करितां चित्त । शांतिरूप होईल ।।३८।। चित्त इच्छितें धर्म अर्थ काम । ब्रह्मभूतत्व मोक्ष अनुपम । भ्रमयुक्त तें संशय परम । मायामोहयुक्त चित्त ।।३९।। नाना भावांत लालस । मायाहीन चित्त सुरस। तेचि शांतिरूप होण्यास । पात्र मानिती जाणते ।।४०।। मी चिंतामणि स्वयं असता । अभिन्नत्व माझें तत्त्वता । तरी भ्रमात्मिका माया आतां । का भुलविते मजलागीं ।।४१।। ऐसा विचार करून । योगामार्गानें चित्त त्यजून । महामुनींनो शांतियोग स्वरूप शोभन । व्हाल तुम्हीं निःसंशय ।।४२।। ऐसें बोलून अन्तर्धान । विष्णु पावले प्रसन्न । वैकुंठांत ते जाती तत्क्षण । नरनारायण शांति लाभले ।।४३।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे तृतीये खंडे महोदरचरिते नरनारायणविष्णुसंवादो नाम द्वादशोऽध्यायः समाप्तः । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय बारांवा संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नमः । वालखिल्य म्हणती भानूसी । तदनंतर नरनारायण ऋषि । काय करिती तें आम्हांसी । सांगावें समस्त विशेषें ।।१।। भानु

म्हणे तयांप्रत । ते नरनारायण ब्रह्मभूत । विष्णूनें सांगितला आचरित । योग ते परम श्रद्धेंने ।।२।। क्रमानें शांति तया प्राप्त । ते दोघे गाणपत्य होत । गणेशाचा महामंत्र जपत । शिवानें जो त्यांस दिला ।।३।। हेरंबाचा मंत्र जपत । चार अक्षरांचा ते पुनीत । रत्नमयी मूर्ति स्थापित । पूजा करिती तियेची ।।४।। ते महामुनी हृदयांत । हेरंबाचें ध्यान करित । शांतिलाभ तयांप्रत । गजानन न सोडिती क्षणभरही ।।५।। ऐसी शंभर वर्षें उलटत । नरनारायण उपासनारत । तेव्हां त्यांच्या आश्रमांत । हेरंब अवतरे सिंहवाहन ।।६।। नाग यज्ञोपवीतयुक्त । चतुर्बाहुधर त्रिनेत्रयुत । सिद्धिबुद्धिच्या सहित । लंबोदर भूषित अलंकारें ।।७।। पुष्पमय माळा त्याच्या गळ्यांत । त्रिशूळ मुद्गर हातीं असत । अंकुशही तेजे तळपत । तेज:पुंज हेरंब तो ।।८।। ऐशा हेरंबा पाहून । मुनिश्रेष्ठ करिती साष्टांग नमन । नंतर करिती यथाविधि पूजन । स्तवन करिती भक्तिभावें ।।९।। गणनाथासी भक्तसंरक्षकासी । भक्तांसी भक्तिदात्यासी । हेरंबासी अनाथनाथासी । गजवक्त्रासी नमन असो ।।१०।। चतुर्बाहुधरासी लंबोदरासी । ढुंढीसी सर्व सारासी । नाना भेद प्रचारकासी । भेदहीना देवा नमन ।।११।। चिंतामणीसी सिद्धिबुद्धिपतीसी । योगासी योगनाथासी । शूर्पकर्णासी सगुणासी । निर्गुणासी नमन असो ।।१२।। परमात्म्यासी सर्वपूज्यासी । सर्वासी देवदेवासी । ब्रह्मांच्या ब्रह्मासी । सदा शांतिप्रदा नमन ।।१३।। सुखशांतिधारकासी । नाभिशेषासी पूर्णासी । पूर्णनाथासी पूर्णानंदासी । योगमाया चालका नमन ।।१४।। खेलकासी अनादीसी । आदिमध्यांत मूर्तीसी । स्रष्ट्यासी पात्रासी संहर्त्यासी । सिंहवाहनासी नमन असो ।।१५।। अभिमान रहितांच्या नाथासी । म्हणोनी हेरंब नामें ख्यातासी । विनायकासी गजाननासी । पुन:पुन्हा नमन असो ।।१६।। योगाभेदमया स्तवन । काय करावें

आम्ही दीन । म्हणोनी भक्तिभावें वंदन । करितो आतां तुष्ट व्हावें ।।१७।। ऐसी स्तुति गाऊन । नरनारायण झाले पदलीन । त्यांसी उठवून गणेशान । घनगंभीर स्वरें म्हणे ।।१८।। मी तुमचा भक्तियंत्रित । वर देईन जो ईप्सित । महाभागांनो तुम्ही जगांत । योगमार्ग प्रकाशक ।।१९।। तुम्हीं रचिलेलें स्तोत्र वाचील । अथवा जो हें ऐकेल । त्यांसी भुक्तिमुक्तिप्रद होईल । प्रीतिप्रद मज लागी ।।२०।। जें जें इच्छिती तें तें देईन । स्तोत्रपाठें मी प्रसन्न । माझी भक्ति लाभून । सिद्धि समस्त प्राप्त होय ।।२१।। भानु सांगे हेरंबवचन । ऐकून नरनारायण हर्षित मन । आदरें करांजली जोडून । विनविती ते गजाननासी ।।२२।। जरी विघ्नपा तूं प्रसन्न । वर देण्यासी उद्युक्त मन । तरी देई भक्ति तव पावन । अव्यभिचारिणी दृढतर ।।२३।। तथास्तु ऐसें वचन । बोलून पावला अन्तर्धान । स्वानंदलोकीं परतून । निजानंदी निमग्न झाला ।।२४।। तदनंतर ते अत्यंत । गणेश भजनीं नरनारायण रत । हेरंब हेरंब ऐसा उच्चारित । मंत्र सर्वदा मुखानें ।।२५।। ऐसा बहुत काळ जात । तदनंतर मार्कंडेयाच्या आश्रमांत । ज्ञानदानार्थ ते जात । करुणायुक्त मानसानें ।।२६।। नरनारायणांसी पाहून । मार्कंडेय करी साष्टांग नमन । करी भक्तिभावें पूजन । पाद संवाहन तदनंतर ।।२७।। त्यांसी विनीतात्मा म्हणत । मार्कंडेय महामुनी तृप्त । धन्य माझा जन्म तप वाटत । विद्या ज्ञानादि सर्व ।।२८।। धन्य माझी मातापिता । तुमचें चरण पाहिले आतां । ऐसी नानाविध स्तुति करितां । भक्तिभावें तुष्ट झाले ।।२९।। मार्कंडेया मनोवांछित । माग तूं वर त्वरित । तुझ्या आतिथ्यें संतुष्ट चित्त । पुरवूं तुझ्या मनकामना ।।३०।। त्यांचे वचन ऐकून । मार्कंडेय प्रतापवान । भक्तिपूर्वक मान लववून । वंदन करूनी म्हणे तयांसी ।।३१।। ज्ञान पूर्ण शांतिप्रद । सांगावें मजला विशद । त्यानें तृप्त होऊन सुखद ।

शांतियोग आचरीन ।।३२।। महामाया मज दाखवावी । तीस जाणून मी त्यागावी । गुरुच्या पायी जडावी । दृढ भक्ति हा वर द्यावा ।।३३।। रवि म्हणे नरनारायण देत । वरदान तें तयाप्रत । शांति योगप्रद गणेशज्ञान सांगत । मुनिपुंगव उत्तम त्यासी ।।३४।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे तृतीये खंडे महोदरचरिते नरनारायणामार्कंडेयसमागमोनाम त्रयोदशोऽध्यायः समाप्तः । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय तेरांवा संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नमः । नरनारायण शांतीमयपूर्ण ज्ञान सांगती । मार्कंडेय मुनी श्रेष्ठ ऐकती । तपानें ब्रह्मचर्यें सिद्ध अससी । ज्ञानग्रहणार्थ येथे निःसंशय ।।१।। शिवानें रामचंद्रासी कथिलें । हें योगदायक ज्ञान पूर्वी तेणें जाहलें । लक्ष्मणाग्रज शांत भले । राज्यसंगे विसरले जें ।।२।। वसिष्ठांचा उपदेश ऐकत । तेव्हां पुनरपि तें ज्ञान लाभत । मार्कंडेय विचारित । कोण हा राम महाभाग ।।३।। जन्मला कोणत्या वंशांत । कोणाचा तो पुत्र असत । हें सर्व सांगा मजप्रत । नरनारायण महामुनींनो ।।४।। रवि वालखिल्यास सांगत । ऐसें ऐकून मार्कंडेयाचें प्रार्थित । ते मुनी होऊनी परमप्रीत । चरित्र वर्णिती राघवाचें ।।५।। ब्रह्माचा पुत्र मरीची असत । कश्यप त्यापासून जन्मत । अदितीपासून कश्यपा लाभत । सूर्य पुत्र जो आत्मा जगाचा ।।६।। सूर्यापासून जन्मत । मनुनामक श्रेष्ठ सुत । वैवस्वत तो प्रख्यात । प्रसिद्ध सातव्या भूमंडळी ।।७।। ब्रह्याचा एक दिवस असत । चतुर्युग सहस्र एवढा विस्तृत । तेवढीच रात्र एक वर्णित । काळवादी महामुनी ।।८।। आपापल्या कालें प्रेरित । चवदा मनू क्षत्रकर्मांत । एक सप्तती यांची अधिक असत । चार मन्वंतरे युगांची ।।९।। स्वायंभू आदी

मनू ख्यात । स्वाधिकारें भिन्न असत । त्यांचें षट्क असे वर्णित । मनुपुत्र विष्णूचे अवतार ।।१०।। विभागशः प्रकाशवित । सर्व धर्म मनू प्रख्यात । देव विप्र सप्त पुरंदर कीर्तित । मनूचे अंश ते सारे ।।११।। भूमिपालन करावें पाळोनी विधान । वर्णाश्रमांचें नियमन । तत्त्वमार्गे कर्मज्ञानादिसाधन । ऋषिगणांनी करावें ।।१२।। मनु सांगे यजमानाचे कार्य करावें । आपुला त्या मन्वंतरी बरवें । त्रिभुवन वृष्ट्यादीनें तारावे। महेंद्रानें कर्मानुसार ।।१३।। कर्मफलानुसार पाळावें । देवानी यज्ञभाग स्वीकारावे । कर्मकर्त्यास फल द्यावें । आदरपूर्वक तयांनी ।।१४।। जेव्हां दैत्यांपासून भय संभवत । इंद्रासी तेव्हां कलांशें रक्षित विडौजसा त्या इंद्रासी त्वरित । विष्णु पालक सर्वांचा ।।१५।। मनूच्या पुत्रपौत्रांनी करावें । प्रजापालन सर्वभावें । क्षात्रधर्मपरायण रहावें । ऐसे षट्क समाख्यात ।।१६।। एक मन्वंतर होता समाप्त । दुसऱ्याचा उदय होत । कर्मानंतर ज्ञाननिष्ठ होत । षट्क नित्य आदरानें ।।१७।। तपानें देह सोडून । जावें स्वधामीं परतून । तोच लय नामें ख्यात असून । मन्वंतर लयात्मक म्हणती ।।१८।। तेथ सर्व जन लय पावती । स्थावर जंगमही अन्तीं । द्वितीय मनुमुख्य जेव्हां उदित होती । भृग्वादी निर्मिति स्वतः तें ।।१९।। योगसेवनें आपणा निर्मित । चराचरमयी सृष्टि घडवित । ऐशीं मन्वंतरे ख्यात । जाणावीं हीं विबुधांनी ।।२०।। ब्रह्माचा दिवसान्त होत । तेव्हा नैमित्तिक लय घडत । त्रैलोक्याचा नाश निश्चित । त्यासमयीं होत असे ।।२१।। ऐशा दिनक्रमें ब्रह्मदेवाचें असत । शतवर्ष आयुष्य संशयातीत । तें पूर्ण आयुष्य भोगितां पावत । पितामहही लयांत मृत्यू ।।२२।। ऐशा क्रमानें त्रैगुण्य असत । नाशरूप तें ख्यात । जन्ममृत्युमयी माया जगांत । नाना द्वंद्व प्रकाशिनी ।।२३।। द्वंद्वभावांत संस्थित । भ्रांतिदा माया कथिली अद्भुत । जन्ममृत्यु युक्ता असत । ऐसें

रहस्य जाणावें ।।२४।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे तृतीये खंडे महोदरचरिते मायावर्णनं नाम चतुर्दशोऽध्याय: समाप्त: । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय चौदांवा संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नम: । मार्कंडेय म्हणे सूर्याप्रत । मायारूप विचित्र उक्त । तें ऐकून तृप्ति संयुक्त । जाहलों मी हर्षित ।।१।। परी मायेचें रूप न जाणिलें । पूर्णभावे जरी मी चिंतिलें । म्हणोनि विस्तारें पाहिजे कथिलें । योगिश्रेष्ठहो पुनरपि ।।२।। वर्णाश्रम विभाग स्व आचार समन्वित । युगमान तैसें समस्त । युगधर्म विशेषें सांगा मजप्रत । पितृदेवासुरांचा कर्ममार्ग ।।३।। सूर्यचंद्रापासून प्रसूत । जे जे राजे त्यांचें चरित । ह्या सर्व प्रश्नांचे उत्तर सुविहित । इंद्रादिक ज्ञानासहित द्यावें ।।४।। हें ऐकून प्रार्थित । नरनारायण मार्कंडेया सांगत । महाभागा सांगूं समस्त । मायाचरित्रांचे ज्ञान आम्हीं ।।५।। लघु अक्षर समन्वित । निमेष मात्र काळ म्हणत । दशपंच निमेष प्रमाण असत । काष्ठाकाल समयाचें ।।६।। तीस काष्ठांचा कलाकाल होत । तीस कलांनी मुहूर्त घडत । तीस मुहूर्तांनी दिवा नक्त । तीस दिवसांचा मास होय ।।७।। एका मासांत पक्षद्वय असत । शुक्ल कृष्ण विभागें ख्यात । ऐसे बारा मास पूर्ण होत । संवत्सर तेव्हां होतसे ।।८।। दोन महिन्यांचा एक ऋतु होत । सहा ऋतु संवत्सरांत । ऐसे कालज्ञ कथित । नाना भावयुक्त कालधर्म ।।९।। संवत्सर पंचधा परिकीर्तित । पहिला संवत्सर दुसरा परिवत्सर असत । इडा वत्सर तिसरा असत । अनुवत्सर चौथा असे ।।१०।। पांचवा वत्सर नाम असत । त्याच्या गती आता सांगत । अंग प्रत्यंग संयोग घडत । काळ प्रभावें सर्वदा ।।११।। अग्नि जो असे जठरांत ।

तो सर्व क्रिया घडवीत । देहाची उत्पत्ति स्थिति होत । नाशही कालप्रभावें ।।१२।। काळामुळे सर्व घडत । तो अग्नि संवत्सर नामें ख्यात । पाचांत मुख्यरूप असत । कालकर्म प्रवर्तक ।।१३।। महायोगी जो देहांत संस्थित । पंडित त्यासी काल म्हणत । परिवत्सर नाम सूर्य असत । कालमय महामुने ।।१४।। अयनादि स्वभावें काळाचा चालक । कालधर्म प्रवर्तक । वर्षा शीत उष्णकालिक । ऋतु मासादि क्रमांत ।।१५।। इडा वत्सर नामा चंद्र असत । ऐसें बुधजन सांगत । तारा नक्षत्रांचा चालक असत । पितरांचे ज्ञान तया असे ।।१६।। अमृत साठवी आपुल्या किरणांत । सोम हा कालक्रमें वर्तत । औषधींचे भाव प्रकटवित । किरणांनी आपुल्या तो ।।१७।। देवजनांसी अमृतपान देत । ऐसा हा चंद्र इडावत्सर असत । अनुवत्सर नामा वायु ख्यात । प्राण अपानादि भावें चालक ।।१८।। आवह प्रवह नेमि ज्योतिषयुक्तां । संचालन घडवितो कालज्ञयुक्त । वत्सर तो रुद्ररूप असत । महालयात औषधी उदय पावती ।।१९।। तेथ कालप्रमाणानें निर्मित । त्र्यंबक औषधींसी कालसंस्थित । गायत्री जगती त्रिष्टुप् प्रख्यात । अंबिका नामें प्रसिद्ध असती ।।२०।। त्या तिघांचें एकरूप घडत । तेव्हां स्ववीर्ये रुद्र निर्मित । पुन्हां औषधि बहुविध जगांत । कालभावें उद्भावन करी ।।२१।। ऐसा पंचविध काल जो जाणत । कालभावाचें दु:ख न होत । स्वभावें त्यास दु:ख न होत । कदापिहि नि:संशय ।।२२।। सहा महिन्यांचें अयन असत । उत्तरायण दक्षिणायन ऐसें ख्यात । कालमान द्विविध जगांत । विप्रर्षे ऐसें जाणावें ।।२३।। दोन अयनांचा दिवस होत । देवतांचा ऐसे ख्यात । उत्तरायण दिवस असत । दक्षिणायन रात्र असे ।।२४।। ऐशा तीस दिवसांचा मास होत । द्वादश मास एका वर्षात । ऐसी कालगणना सर्वत्र असत । विप्रश्रेष्ठा जगतांत ।।२५।। शुक्लपक्षमयी

रात्री असत । कृष्ण पक्ष तो दिवस ख्यात । पितरांसी सुखदायी निश्चित । ऐसें रहस्य जाणावें ।।२६।। द्विविध मास असती ख्यात । सौरमास चांद्रमास ऐसे उक्त । संक्रमणानें रविमास प्रख्यात । रविज ऐसें नाव तया ।।२७।। पौर्णिमेसी पूर्ण चंद्र दिसत । त्या आधारें चांद्रमास ख्यात । अथवा क्षीण चंद्र जेव्हां होत । अमावस्या ती प्रमाण ।।२८।। ऐसा चांद्रमास द्विविध कीर्तित । त्याचें कारण सांगतों तुम्हांप्रत । अधिकमास तैसा क्षयमास असत । मलात्मक तो ख्यात असे ।।२९।। चंद्र चिन्हें केवळ ज्ञात । चंद्राचें रूप अमावस्येंत । स्नानार्थ मासमाहात्म्य प्रस्तुत । पौर्णिमेचें विशेषें ।।३०।। चांद्रमासानें असे ज्ञात । पितरांचा काल जगतांत । देव पितर स्वर्गांत । सुधा पान सर्वदा करिती ।।३१।। पूर्ण सोमकला भूत । चांद्रमासांत न घडत । देवांचा दिवस होई ख्यात । सूर्य चिन्हें जगतांत ।।३२।। शुक्ल कृष्णगति कारण असती । ऐसें जाणावें स्वचित्तीं । तीन वर्ष सहस्त्रे मानवांची होती । तेव्हां एक दिव्य दिवस ।।३३।। तीनशे वर्षांहून अधिक असत । सप्तर्षींचा दिवस ख्यात । मानवांची नऊ सहस्त्र नव्वद वर्षें होत । तेव्हां एक ध्रुव संवत्सर ।।३४।। ऐसें हें कालप्रमाण सांगितलें । द्विजोत्तमा तें मृत्युयुक्त झालें । द्वंद्व संयुत भ्रान्ति पावलें । ऐसें रहस्य जाणावें ।।३५।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे तृतीये खंडे महोदरचरिते कालगतिवर्णनं नाम पंचदशोऽध्यायः समाप्तः । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय पंधरांवा संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नमः । नरनारायण पुढें सांगती । चार युगांची काल मिति । दिव्य द्वादश वर्षे सहस्त्र ऐसी गणती । विबुधांनी जाणावी

।।१।। चार सहस्रवर्षाचें कृत युग होत । आठशें वर्षें संधिकाल होत । तीन वर्ष सहस्र त्रेतायुग कीर्तित । संध्यांश द्विगुण जाणावा ।।२।। दोन सहस्र वर्षें द्वापार युग असत । संधिकाळ द्विगुण असे युक्त । एक सहस्र वर्षे कलियुग नांदत । तेथहीं संधि द्विगुण असत ।।३।। ऐसे द्वादश सहस्र देववर्षेपर्यंत । चतुर्युगांचे प्रमाण कथित । कृत त्रेता द्वापर कलि ऐसा असत । क्रम हा चार युगांचा ।।४।। कृत युगांत मुख्य ध्यान । त्रेता युगांत तप यज्ञ याजन । द्वापारांत आचार असें पूजन । कलियुगीं स्तवन मुख्य असे ।।५।। ब्राह्मधर्म कृतयुगांत । चतुष्पाद सनातन प्रख्यात । त्रेता युगांत त्रिपद तो होत । ऐसे धर्मवेत्ते सांगती ।।६।। द्वापारयुगीं द्विपद धर्म असत । ऐसें सर्व शास्त्रांत संमत । एक पद धर्म कलियुगांत । तोही अन्तीं नाश पावे ।।७।। कृत युगांत ज्ञान पुज्य असत । रवि मान्य होय त्रेतायुगांत । द्वापारांत विष्णु दैवत । कलियुगी शंभु मुख्य म्हणती ।।८।। परी चतुर्युगांच्या कालावधीत । गणेश मुख्य भावें सर्व पूजित । आपुली सिद्धि प्राप्त होण्या जगांत । मानव प्राणी सर्वकाळ ।।९।। कश्यपाचा सुत विनायक ख्यात । सिंहारुढ दिक्बाहु तेजयुक्त । षड्भुज मयुरेश पूजिती भक्त । त्रेतायुगांत आदरें ।।१०।। शिवाचा सुत मयूरवाहन । शशिवर्ण त्याचा कांतिमान । द्वापारांत पूजिती गजानन । मूषकारुढ चतुर्बाहू ।।११।। वरेण्य नृपतीचा सुत । रक्तवर्ण तो ख्यात । कलियुगांत अवतार घेत । धूम्रवर्ण नामें तो ।।१२।। अश्वावरी तो बसेल । द्विबाहु युक्त असेल । सर्व भावतारक होईल । पूजनीय गणेश देव ।।१३।। परि ब्रह्माकारें अभिन्न असत । सिद्धिदाता चार युगांत । एक लक्ष वर्ष असे ख्यात । मानव आयुष्य कृत युगांत ।।१४।। दहा हजार वर्षें त्रेता युगांत । सहस्र वर्षे द्वापारांत । शंभर वर्षे कलियुगात । अंती पंधरा वर्षे न्यून होय ।।१५।। स्वधर्मनिष्ठ

सर्वहितरत। ऐसे जन कृतयुगांत । भेदहीन ते सन्मान करित । भक्तिभावें परस्परांचा ।।१६।। कलहादि वर्जित मत्सर विहिन असत । बाल्यापासून धर्मरत । सदा आनंदयुक्त चित्त । विषय सुखा तुच्छ मानिती ।।१७।। सदा असती ज्ञानयुक्त । ध्यानपरायण सुखांत । वर्णाश्रम धर्म पालन करित । आपुले आचार श्रद्धेनें ।।१८।। योगाभ्यास परायण असती । ब्रह्मावरी श्रद्धा ठेविती । केवळ ऋतुकाळी भोगिती । विषयसुख शास्त्रसंमत ।।१९।। अंतर्बाह्य एकभाव राहून । सुखें भोगिती आसक्ती सोडून । ऐसे श्रेष्ठ धार्मिक जन । कृत युगांतले वर्णिले ।।२०।। त्रेतायुगांत नरकपाद हीन । धर्म असतो म्हणून । अंतर्बाह्य भाव भिन्न । लोक होती त्या वेळीं ।।२१।। स्वार्थ परार्थी न ते समान । विषयेच्छायुत असती जन । संध्यांश मार्गाचें प्रमाण । आठशें वर्षें मानिलें असे ।।२२।। कृतयुगांती चार शत । त्रेता युगारंभी तीन शत । शत सप्तक वर्षें संध्यांश ख्यात । कृत धर्म क्रमें विनाश पावे ।।२३।। सातशें वर्षें समाप्त होत । तेव्हा त्रेता धर्म होय उपस्थित । संध्यांश होता समाप्त । प्रभाव दुसऱ्या युगाचा ।।२४।। द्वापारांत द्विपद धर्म । स्वार्थ परायण करिती कर्म । छंद असती कलहादिसम । ऐसें मानव त्या युगीं ।।२५।। बाह्य भावें साधूंचे सेवक । धर्मपरायण नि:शंक । लज्जायुक्त असती इच्छुक । अंतरी विषयसुखाचे ।।२६।। दुसऱ्यांच्या लज्जेस्तव धर्म आचरिती । परि स्वगृहीं विषयेच्छायुत असती । धर्मलोपक ते मलिन चित्तीं । ऐसे नर द्वापार युगीं ।।२७।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे तृतीये खंडे महोदरचरिते युगधर्मवर्णनं नाम षोडशोऽध्याय: समाप्त: । श्रीगजाननार्पणमस्तु।

(अध्याय सोळांवा संपूर्ण)